

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

# मराठी अभ्यास परिषद पत्रिका

## भाषा आणि जीवन

वर्ष ५ : अंक ३ : पावसाळा १९८७








अनुक्रमणिका

अनुक्रम



---

**प्रकाशन :** त्रैमासिक ( जानेवारी, मार्च, जून, ऑक्टोबर )
**संपादन–समिती :** अशोक रा. केळकर ( प्रमुख ), कल्याण काळे, अंजली सोमण, द. दि. पुंडे, प्र. ना. परांजपे, मॅक्सीन बर्न्सन
**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** ए–२ परिमल, १२३९–ए आपटे रस्ता, पुणे ४११००४ (दूरध्वनी ५२००९)
**व्यवस्थापकीय संपर्क व पैशाचा भरणा :** चिटणीस, मराठी अभ्यास परिषद, १।८ आगरकर नगर, पुणे ४११ ००१ ( दूरध्वनी ५६४४९, ५४०६९ )
**पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरणपृष्ठ तीन पहा.
**सूचना :** पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच असे नाही.
या अंकाच्या मुद्रणासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे.
बदललेल्या दूरध्वनी क्रमांकांची नोंद घ्यावी.

---

संपादक : अशोक रा. केळकर / प्रकाशक व मुद्रक : मराठी अभ्यास परिषदेसाठी प्र. ना. परांजपे / मुद्रणस्थळ : संजीव मुद्रणालय, ४६९ सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०.

# तोंडी मांडणे

विचारांच्या प्रसाराचे माध्यम म्हणून व्याख्यान या भाषण-प्रकाराचे महत्त्व हल्ली पूर्वीपेक्षा पुष्कळच कमी झाले असले, तरी चर्चासत्र किंवा परिषद या भाषण–प्रकाराचे महत्त्व मात्र कमी न होता उलट वाढलेले दिसते. सेमिनार, कॉन्फरन्स, सिंपोझियम, वर्कशॉप, सुमारे १९५५ पासून प्रचारात आलेले ब्रेनस्टॉर्मिंग सेशन, इत्यादी नवनवीन इंग्रजी नावांना मराठी प्रतिशब्द स्थिर होत आहेत–अनुक्रमे चर्चा-सत्र, परिषद–संमेलन, परिसंवाद, कार्यसत्र, विचारमंथनसत्र, इत्यादी. (कुणी मेंदू-वादळ-बैठक असे पुटपुटले का ? असू दे, असू दे.) त्या मानाने त्यांचे मराठी अर्थ-भेद मात्र अजून स्थिर झालेले दिसत नाहीत, तो भाग निराळा. बौद्धिक हा देशी प्रकारही येऊन गेला. मुद्दा हा, की आपले म्हणणे परिणामकारक रीतीने तोंडी मांडता येण्याचे महत्त्व अजूनही कमी झालेले नाही. किंबहुना आजच्या लोकशाही समाजप्रक्रियेत ते अमळ वाढलेलेच दिसते. असे जरी असले तरी तोंडी मांडण्याची कला मात्र वाढीस लागलेली दिसत नाही. ती शाळा–कॉलेजांतून कुणी मौखिक प्रस्तावन नावाचा विषय शिकवत नाही. वक्तृत्व नावाचा एक प्रकार काही मूठभर विद्यार्थ्यांना पकडून घोटवला जातो आणि तीच ती उपरे अलंकरण, अतिशयोक्ती, आवाजाचे ‘ नाटकी ’ चढउतार, अवतरणांची पखरण, आणि विनोदांची लागवड यांच्यावर विसंबणारी व विचारशीलतेशी जणू वैर मांडणारी पद्धत (तिला शैली म्हणणे कठीण आहे) त्यांच्या गळी जरूर उतरवली जाते. परिणामी चर्चासत्र वगैरे प्रकार जितके उपयोगी व्हायला पाहिजेत तेवढे होत नाहीत. पाल्हाळ, गोष्टी-वेल्हाळपणा, फापटपसारा, पुनरुक्ती, कृत्रिम वक्तृत्व इत्यादींच्या गाळात रुतून मात्र बसतात.

अगदी प्राथमिक गोष्ट म्हणजे स्वतःचा आणि इतरांचा जो बहुमोल वेळ खर्च करायचा, त्याचे साधे बजेट बसवणे हेही आमच्या हातून होत नाही. पहिल्या एक-दोन वक्त्यांनी वेळ खाल्ल्यामुळे नंतरच्या वक्त्यांवर अन्याय होणे नेहमीचेच. एखाद्या सभापतीने नेहमीचा भिडस्तपणा किंवा कंटाळलेपणा (कुणाकुणाला आवरायचे ?) सोडून घंटेचा वापर केलाच, तर वक्ते त्याला धुडकावायला किंवा त्याच्यावर राग-वायला तयार ! बोलणारा पेशाने अध्यापक असला, तर त्याची सवयीची पंचेचाळीस –पंचावन्न मिनिटे संपेपर्यंत तो ऐकायला तयार नसतो, लिहून काढलेला मजकूर असला तर तो सगळाच्या सगळा त्यातल्या आकडेवारीसकट आणि एकूणएक तपशील वा उदाहरणे यांच्यासकट वाचायची हौस ! वेळ कमी असल्याचे

(श्रोत्यांच्या दुर्दैवाने) वक्त्याच्या लक्षात आले, तर तो सगळा मजकूर राजधानी एक्स्प्रेसच्या गतीने वाचून वेळेत संपवतो आणि विजयी मुद्रेने सभेकडे बघतो.

पण हा सांगायचा मजकूर श्रोत्यांपर्यंत पोचतो आहे की नाही, हे पाहण्याचे वक्त्याच्या मनातही येत नाही. श्रोत्यांनी दाद दिली, तर फुशारून जायचे आणि दिली नाही किंवा ' उलटी दाद ' दिली, तर हिरमुसायचे, एवढेच वक्त्याला ठाऊक असते. समजा, श्रोत्यांनी दाद दिली तर त्याचा अर्थ मजकूर श्रोत्यांपर्यंत पोचला किंवा चर्चासत्राचा हेतू साध्य झाला असा होत नाही. म्हणायचे चर्चासत्र, पण चर्चेला वेळ राहिला नाही, तर सभापतींना सुद्धा त्याची फिकीर नसते. चर्चासत्राच्या वेळी एकजण निबंध वाचत वा सांगत असला, तर उरलेल्या नियोजित निबंध-वाचकांच्या तोंडाकडे पाहावे. जणू ते त्या गावचेच नसतात. त्यांची पाळी यायची असली, तर त्या ताणाखाली अस्वस्थ, पाळी होऊन गेली असली, तर कंटाळयाचा भाव. (काही तर आपली पाळी झाल्यावर सरळ उठून चालायला लागतात.) चर्चासत्र इत्यादी गोष्टी सगळ्यांनी मिळून करायचे आणि काही हेतू मनात ठेवून करायचे कार्यक्रम असतात, याचा सर्वांना विसर पडलेला असतो. कदाचित तेवढेही नाही– मुळात जाणीवच नसते, तर विसर तरी कुठला ?

सुदैवाने आजच्या तरुण पिढीत ही स्थिती बरी नसल्याची अंधूक तरी जाणीव उत्पन्न होताना दिसते आहे. पण त्यांना काय करायला पाहिजे, ते कुणी सांगितलेले नसते आणि स्वतःच वाट हुडकून काढण्याइतकी तयारी नसते. (म्हणजे दोन्ही अर्थांनी तयारी नसते, उत्साह नसतो आणि क्षमता नसते.)

अगदी साधी गोष्ट. उपलब्ध वेळ आणि लिहिलेला मजकूर यांचे गणित माहीत नसते. अनौपचारिक गप्पांमध्ये आपण मिनिटाला दोन अडीचशे शब्द या गतीने जरी बोलत असलो, तरी तोंडी मांडणी करताना तो वेग शंभर–सव्वाशे शब्दांपर्यंत कमी करावा लागतो. नवशिक्या वक्त्याने त्याप्रमाणे अगोदर मजकूर लिहून काढायला हरकत नाही. लिहिलेला निबंध उपलब्ध वेळात बसण्यासारखा नसला, तर त्यापैकी जरूर तेवढा भाग निवडून काढून त्याला खुणा कराव्या म्हणजे आयत्या वेळी गडबड होत नाही. अनुभवी वक्त्याने सुद्धा अधूनमधून घड्याळाकडे नजर टाकण्यात कमी-पणा मानू नये आणि श्रोते, इतर वक्ते, आणि सभापती यांचा दुवा घ्यावा.

अर्थात् मजकूर लिहिलेला असला, तरी तो सरळ सरळ वाचण्याचे टाळावे. अगदी बातम्या वाचून दाखवणारा दूरचित्रवाणीवरचा निवेदक असला, तरी तो श्रोत्यांशी आवर्जून नेत्रसंवाद साधतो. एखादे विशिष्ट अवतरण वाचून दाखवणे निराळे आणि सगळाच्या सगळा मजकूर वाचून दाखवणे निराळे. पण मजकूर पाठ करून तो म्हणून दाखवणे हा यावर उपाय नव्हे, कारण त्यामुळे कंटाळवाणेपणा टळत नाही. तोंडी मांडणे हे शेवटी तोंडी सांगणे आहे, तोंडी म्हणणे किंवा पठन करणे नव्हे. श्रोत्यांशी

संवाद आवश्यक आहे.

हा सांगायचा मजकूर निवडून घेताना तारतम्य बाळगावे. आकडेवारी कमीत कमी ठेवावी, कोष्टके किंवा तक्ते वाचून दाखवणे तर नेहमीच निष्फळ ठरते. आकडेवारी, कोष्टक, आकृती, उदाहरणे श्रोत्यांच्या डोळ्यांसमोर राहणे हे मुद्द्याचे आणि म्हणून जरुरीचे वाटले, तर फळा, भित्तिपत्र, किंवा उत्तम म्हणजे चक्रमुद्रित करून घेतलेले हस्तपत्र यांचा आश्रय घ्यावा.. (फळा, भित्तिपत्र किंवा चित्रप्रकाशकासाठी वापरायची पारदर्शिका वा पत्रिका यावरचा मजकूर पुरेसा ठळक, मोठा, मोकळा असेल, याची खबरदारी घ्यावी. जवळून सुवाच्य असणे आणि लांब अंतरावरून सुवाच्य असणे या वेगळ्या गोष्टी आहेत.)

हा झाला पूरक मजकुराची हाताळणी कशी करावी, याचा विचार. पण मुख्य मुद्दे मांडणाऱ्या मजकुराचे काय ? त्याही मजकुराची निवड करावी लागते. दिलेल्या वेळात सगळे मुद्दे नीट उलगडणार नाहीत हे लक्षात आले, तर वक्त्यापुढे निरनिराळे उपाय असतात- एक म्हणजे मुख्य मुद्दा तपशीलवार घेऊन गौण मुद्द्यांचा संक्षेप करणे, गौण मुद्दे अजिबात गाळून टाकणे, आणि अगदी निर्वाणीचा उपाय एक-दोन मुख्य मुद्देच तार्किक क्रम आणि संगती यांना धक्का न लावता गाळणे. सगळे मुद्दे कायम ठेवून ते कसेतरी उरकण्यापेक्षा निवडक मुद्दे घेऊन त्यांना (आणि श्रोत्यांनाही !) न्याय देणे केव्हाही बरे. पण हे तारतम्य वक्ता पुष्कळदा दाखवत नाही आणि निर्वाणीचा उपाय करायला कचरतो आणि परिणामी त्याची मांडणी निष्फळ होते.

श्रोत्याची श्रुतिग्रहणशक्ती जशी कमी-अधिक मर्यादित असल्याचे आपण पाहिले, तशी त्याची बुद्धिग्रहणशक्तीही कमी अधिक मर्यादित असते. अनुभवी आणि आपले म्हणणे श्रोत्यांपर्यंत पोचावे याची कळकळ बाळगणाऱ्या वक्त्याला याची जाणीव असते. मात्र पहिलीच्या बाबतीत मिनिटाला किती शब्द याचे साधे गणित मांडता येते तसे इथे मांडता येत नाही. सामान्य बुद्धिमत्तेच्या प्रौढ, सुशिक्षित श्रोत्याच्या बाबतीत ते तीन मिनिटांत एक उपमुद्दा असे काही तरी असावे. श्रोत्यांचे वय, शिक्षण, बुद्धिमत्तेचा दर्जा आणि विषयाचे पूर्वज्ञान यांनुसार हे ढोबळ गणित सुद्धा बदलावे लागेल. या ठिकाणी पक्के गणित माहीत असण्याची इतकी गरज नाही, तर श्रोत्यांच्या बदलत्या प्रतिक्रिया, त्यांच्या चेहऱ्यांवरच्या सुरकुत्या, अस्फुट उद्‌गार यांचा वेध घेण्याची तयारी असायला पाहिजे. निदान वक्त्याला याबाबतीत कळकळ आहे, एवढे जरी श्रोत्याला कळले, तरी श्रोता त्याला अर्ध्या वाटेवर गाठण्याचा प्रयत्न करतो.

मुख्य भाषणानंतर प्रश्नोत्तरे किंवा मुक्त चर्चा यांची योजना असते- म्हणजे असायला हवी. त्याचीही काही पथ्ये आहेत. प्रश्नकर्ता किंवा चर्चाकार यांनीही काही

तारतम्य, काही वेळेचे गणित पाळणे अगत्याचे आहे. चर्चा मुक्त ठेवायची, का केवळ प्रश्न विचारायचे, का यांमधली एक मर्यादा पाळायची याचें संकेत अगोदर निश्चित करायला पाहिजेत, सभापतींनी त्या संकेतांची आठवण करून द्यायला पाहिजे आणि सभेचे नियंत्रण करायला पाहिजे, आणि मुख्य वक्ता आणि इतर बोलणारे यांनी हे संकेत आपण होऊन पाळायला आणि सभापतीचे नियंत्रण स्वीकारायला पाहिजे.

तर असा हा तोंडी सांगण्याचा वसा आहे.

**अशोक रा. केळकर**

**अनुभव आणि कलाकृती**

खत झाडाच्या शेंड्यावर थापायचे नसते, झाडाच्या बुंध्याशी घालायचे असते.

**शंकर** (शंकर्ज वीकली चालवणारे प्रसिद्ध व्यंग्यचित्रकार)

**भावुकता आणि उत्कटता**

कवितेनं आपलं तोंड चुंबनासाठी आपल्यापुढे केलं, तर ते आपल्याला आवडत नाही.

**फर्किन** (**'वर्ल्ड ऑव्ह पोएट्री'**मधून)

**गफलत**

कुकवीच्या बाबतील पुष्कळदा होतं असं, की ज्या ठिकाणी जाणीव असायला पाहिजे, त्या ठिकाणी तो नेणीवयुक्त राहतो आणि उलट ज्या ठिकाणी नेणीव असायला पाहिजे, त्या ठिकाणी तो जाणीवयुक्त राहतो.

**टी. एस्. एलिएट,** 'ट्रॅडिशन अँड द इंडिव्हिज्युअल टॅलंट' (निबंध)

**प्रेषक : पुरुषोत्तम पाटील, धुळे**

# पाणिनीय व्याकरण : परंपरा आणि पद्धती

वा. बा. भागवत

[मुंबई विद्यापीठात एप्रिल १९८७ मध्ये झालेल्या 'मराठी व्याकरण व शुद्ध-लेखन' यावरील चर्चासत्राचा वृत्तांत **भाषा आणि जीवन**, उन्हाळा १९८७ मध्ये येऊन गेला आहे. या सत्रात भागवतशास्त्र्यांनी दिलेले व्याख्यान इथे लेखरूपाने देत आहोत. ज्या परंपरेचा गौरव सर्वच भाषाभ्यासक करतात ती आहे तरी कशी, हे जाणून घ्यायला पत्रिकेच्या वाचकांना आवडावे.]

१

सुमारे अडीच हजार वर्षांपूर्वी पाणिनिमहर्षींनी त्यांच्या कालातील प्रचलित भाषेचे व्याकरण तयार केले. त्या व्याकरणग्रंथावर टीका, उपटीका, निबंध वगैरे स्वरूपाचे अनेक ग्रंथ लिहिले गेले. ह्या सर्व ग्रंथांचा पाणिनीय व्याकरण परंपरेत समावेश होतो. ह्या सर्व ग्रंथांचे ढोबळ मानाने तीन प्रकार पडतात : आकर, टीका, निबंध.

आकरग्रंथ म्हणजे स्वयंप्रमाण ग्रंथ. आकर म्हणजे खाण. खाणीतून सोने, चांदी वगैरे धातू काढून त्यावर काही संस्कार करून ते वापरले जातात. स्वतंत्रपणे सोने-चांदी तयार करता येत नाही. त्याचप्रमाणे आकर ग्रंथातील विधाने, वचने त्यांच्यावर काही संस्कार म्हणजे अर्थविवरणात्मक टीका वगैरे लिहून उपयोगात आणावी.स्वतंत्र विधाने टीकाकारांना करता येणार नाहीत. असे आकर ग्रंथ प्राचीन पाणिनीय परंपरेने तीनच मान्य केले आहेत : अष्टाध्यायी, वार्तिकपाठ, महाभाष्य. प्रथम त्यांचा स्वल्प परिचय करून घेऊ.

**अष्टाध्यायी** : हा सूत्रमय ग्रंथ पाणिनि महर्षींनी रचलेला आहे. त्याचे आठ अध्याय, प्रत्येक अध्ययात चार पद, आणि प्रत्येक पदात आवश्यकतेनुसार कमी-अधिक सूत्रे एकूण सूत्रे सुमारे चार हजार. सर्वांत कमी सूत्रे दुसऱ्या अध्यायातील दुसऱ्या पदात ३८. तर सर्वांत अधिक सूत्रे सहाव्या अध्यायातील पहिल्या पदात २२३ आहेत. सूत्र म्हणजे अत्यंत छोट्या वाक्यात सांगितलेला नियम. चार हजार सूत्रे म्हणजे चार हजार छोटी सुटसुटीत नियम वाक्ये आहेत. अष्टाध्यायीचे ग्रंथ

परिणाम सुमारे अकराशे आहे. ग्रंथ म्हणजे बत्तीस अक्षरे.[1]

**वार्त्तिक पाठ** : म्हणजे पाणिनीनंतर सुमारे तीनशे वर्षांनी रचलेली पाणिनीच्या सूत्रांवर विवरण करणारी, भर घालणारी, आणि त्यांत दुरुस्ती सुचविणारी टिपणे, त्यांची रचना सूत्राप्रमाणेच सुटसुटीत. वार्त्तिके सुमारे ४३०० आहेत. त्यांतील सुमारे १२०० नवीन विधान करणारी तर इतर सूत्रांचे विवरण करणारी आहेत. बहुतेक सर्व वार्त्तिक कात्यायन ऋषींनी केली, अशी प्राचीन परंपरेची धारणा. त्यांतील काही श्लोकरूप आहेत. काही इतरांची मते मांडणारी आहेत. त्यामुळे ही सर्व एकाचीच नसावी, असे काही प्राचीन टीकाकारांचे आणि नवीन अभ्यासकांचे मत आहे. ही वार्त्तिके वररूचि नावाच्या भाषाभ्यासकाने लिहिली, असेही उल्लेख आहेत. कात्यायन हे कतपासून तयार झालेले गोत्र नाव, सध्याच्या आडनावांसारखे तर वररुचि हे व्यक्तिनाम असावे, असा काही अभ्यासकांचा तर्क आहे. वार्त्तिककाराने व्याकरणाला काही तात्त्विक बैठक दिली.

**महाभाष्य** : हा सूत्रे आणि वार्त्तिके ह्यांचे विस्तृत विवरण करणारा ग्रंथ इसवी-सनपूर्व दुसऱ्या शतकात पतंजलिमहर्षींनी रचलेला आहे. सूत्र-वार्त्तिकांपेक्षा हा फारच विस्तृत आहे. अनेक विषयांची चर्चा अनेक पैलू मांडून करणारा हा ग्रंथ टीकाग्रंथ एक आदर्शच आहे. अनेक कल्पित कथा, दाखले, लोकोक्ती, इत्यादींनी सजलेला अतिशय प्रसन्न शैलीत विवेचन करणारा हा ग्रंथ संस्कृत वाङ्मयात महाभाष्य पद-वीला पात्र झालेला एकमेव ग्रंथ म्हणून मान्यता पावलेला आहे. सुमारे सतराशे पाणिनिसूत्रांवर विवेचन ह्यात आहे. ह्याचे परिमाण सुमारे छत्तीस हजार ग्रंथ इतके आहे. महाभाष्यात सूत्रवार्त्तिकांचे विवरण, तसेच काही थोडी नवीन विधानेही आहेत, त्या विधानवाल्यांना इष्टि असा शब्द टीकाकारांनी वापरला आहे. वार्त्तिक आणि महाभाष्य हे दोन ग्रंथ आकर ग्रंथ असले, तरी ते टीका-ग्रंथ ह्या प्रकारातही

१. ग्रंथाची लांबी मोजण्याचे हे प्राचीन परिमाण आहे. फार प्राचीन काळी लिपी नसल्याने व लिपी वापरात आल्यावरही तिचा वापर कण्ठस्थीकरणावरील पारं-परिक श्रद्धा, नवीनाचा स्वीकार म्हणजे अधार्मिकपणा ही कल्पना, लेखनाच्या साधनसामग्रीची दुर्मिळता, त्यातील काही दोष, इत्यादी कारणांनी विद्वानांनीही मोकळेपणाने स्वीकारला नाही. त्यामुळे वाङ्मय टिकविण्याचे साधन म्हणजे तोंडपाठ करणे, वरचेवर उजळणी करणे व जसेच्या तसे पुढील पिढीला देणे. यासाठी गद्य रचनेपेक्षा पद्य रचना अधिक सुकर म्हणून बहुतांश वाङ्मय पद्यात, त्यातही अनुष्टुभ या सोप्या वृत्तात रचले गेले. अनुष्टुभ वृत्तात आठ अक्षरी चार चरण म्हणजे बत्तीस अक्षरे– त्यामुळे एक ग्रंथ म्हणजे एक अनुष्टुभ म्हणजेच बत्तीस अक्षरे.

समाविष्ट होतात. तथापि, विवरण करताना अथवा स्वतंत्रपणे त्यांनी काही विधाने केली आणि व्याकरणपरंपरेत ती सूत्राप्रमाणेच स्वयंप्रमाण वचने म्हणून स्वीकारली गेली. त्यामुळे त्यांचा समावेश आकरग्रंथ ह्या प्रकारात केलेला आहे.

**टीका-ग्रंथ** (वृत्तिग्रंथ) : ह्या प्रकाराचे दोन पोटप्रकार आहेत : अष्टाध्यायीचे सूत्रक्रमाने केलेले विवरण. सूत्रांचा मूळचा अनुक्रम बदलून प्रकरणानुसार केलेले विवरण.

वार्त्तिके, महाभाष्य ह्या दोन आकरग्रंथांचे विवरण सूत्रक्रमानेच करणारे टीका-ग्रंथ नंतरच्या दोन हजार वर्षांत पुष्कळ झाले पण बरेच ग्रंथ सध्या उपलब्ध नाहीत. अन्य उपलब्ध ग्रंथांतील उल्लेखावरूनच ते असावे, असा अंदाज करावा लागतो. महाभाष्यानंतरचा सध्या उपलब्ध संपूर्ण टीकाग्रंथ म्हणजे **काशिकावृत्ति**, हा इसवी-सन सातव्या शतकात जयादित्य आणि वामन ह्या दोन पंडितांनी लिहिलेला आहे. महाभाष्यापासून काशिकावृत्तीपर्यंत सातशे वर्षांपेक्षा अधिक काल लोटला. ह्या प्रदीर्घ कालावधीत पाणिनिसूत्रांवर विवरण ग्रंथ झाला नाही, हे शक्य नाही. कारण सूत्रार्थांची परंपरा केवळ मुखाने राहणे शक्य नाही. काशिकावृत्तीच्या विशेष गुण-वत्तेमुळे ते ग्रंथ परंपरेतून मागे पडले असावे व कालांतराने दुर्मिळ झाले असावे. पुरुषोत्तमदेवाने बाराव्या शतकात लिहिलेली **भाषावृत्ति** विश्वेश्वराचा **व्याकरण-सुधानिधि,** तर सतराव्या शतकात अन्नंभट्टाने लिहिलेली **मिताक्षरा,** इत्यादी अनेक वृत्तिग्रंथ पहिल्या प्रकारातील आहेत. पण या सर्वांमध्ये काशिकावृत्तीचे आधिपत्य परंपरेत टिकून आहे.

सूत्रकाराने अष्टाध्यायीमध्ये सूत्रे विषयानुसार एकत्र दिलेली आहेत. धातूंचे आदेश, प्रत्ययांचे आदेश, आगम, स्वरसंधी, व्यंजनसंधी अशा एकाएका विषयाची सर्व सूत्रे एकेका ठिकाणी दिलेली आहेत. त्यामुळे एखादे शब्दरूप बनवायचे, तर अनेक ठिकाणी विखुरलेली सूत्रे अभ्यासावी लागतात. अगदी प्राथमिक अभ्यास-काला हा खटाटोप झेपणारा नाहीच, पण मध्यमप्रतीच्या जाणकारालाही बुद्धीला शीण आणणाराच वाटेल तो खटाटोप अगर शीण टळावा, म्हणून सुबन्त (विभक्ति-रूपे), तिङन्त (क्रियापदे), तद्धित (नामसाधिते), कृदन्त (धातुसाधिते), समास, कारक अशा प्रकरणांनुसार सूत्रांचे नव्याने संकलन करून मग विवरण करणारे ग्रंथ अभ्यासकांच्या सोयीसाठी तयार केले गेले. अशा टीकाग्रंथांचा प्रारंभ पुष्कळच नंतर झाला असावा. धर्मकीर्ति या विद्वानाने बाराव्या शतकात लिहिलेला **रूपावतार** हा ग्रंथ प्रकरणानुसार लिहिलेल्या सध्या उपलब्ध अशा टीकाग्रंथांपैकी जुन्यांत जुन्या आहे. विमलसरस्वतींची **रूपमाला,** माधवाचार्यांची **माधवीय धातुवृत्ति** (चौदावे शतक), रामचंद्र शेषांची **प्रक्रियाकौमुदी** (पंधरावे शतक), भट्टोजी दीक्षितांची **वैयाकरणसिद्धांतकौमुदी** (सतरावे शतक), नंतर ह्याच ग्रंथांचे संक्षेप **मध्यसिद्धांत-**

**कौमुदी, सारसिद्धांतकौमुदी, लघुकौमुदी** इत्यादी ग्रंथ प्रकरणानुसार सूत्र-विवरण करणारे आहेत. ह्या सर्व प्रकरण-ग्रंथांमध्ये भट्टोजी दीक्षितांची **वैयाकरण-सिद्धान्तकौमुदी** ह्या ग्रंथाला सतराव्या शतकापासून आजतागायत अध्ययन– अध्यापन-परंपरेमध्ये त्याच्या विशेष गुणवत्तेमुळे आगळे स्थान आणि अखंड परंपरा लाभलेली आहे. टीकाकारांच्या अनेक आक्षेप–प्रत्याक्षेपाच्या अग्निदिव्यातून तावून सुलाखून तो निघालेला आहे. बाराव्या शतकात सुरू झालेली प्रकरणानुसार विवरण करण्याची परंपरा सतराव्या शतकातील **सिद्धांतकौमुदीने** कळसाला पोहोचवली आहे.

वरील दोन्ही प्रकारच्या टीकाग्रंथांवर टीका, त्या टीकेवर उपटीका अशी परंपरा अठराव्या शतकापर्यंत चालू होती. काशिकाग्रंथांवर जितेंद्रबुद्धि नामक बौद्ध पंडिताने **काशिकाविवरणपञ्जिका** ही टीका आठव्या शतकात लिहिली. तसेच हरदत्त पंडिताने बाराव्या शतकात **पदमंजिरी** टीका लिहिली वैयाकरणसिद्धांत–कौमुदीवर त्याचे लेखक भट्टोजी दीक्षित यांनी स्वतःच **प्रौढमनोरमा** नावाची टीका लिहिलेली आहे. (ग्रंथकाराने स्वतःच लिहिलेल्या टीकेला स्वोपज्ञटीका असा शब्द प्राचीन परंपरेत वापरला जातो.) ह्या ग्रंथावर **लघुशब्देन्दुशेखर** ही टीका अठराव्या शतकातील प्रसिद्ध विद्वान नागोजी भट्ट यांनी लिहिलेली आहे. अशा प्रकारे टीकोपटीकांनी हा दुसरा प्रकार भरपूर समृद्ध झाला आहे.

**निबंध-ग्रंथ** : हा आकरग्रंथाचा एखाद्या विषयासंबंधी अभिप्राय उपपत्तीसह मांडणे, त्यासंबंधी इतर ग्रंथकारांनी दिलेली मते विचारात घेऊन त्यासंबंधी शास्त्राचा सिद्धांत सप्रमाण सांगणे हे कार्य करतो. क्वचित ठिकाणी मूळसूत्रांचे किंवा भाष्यादी प्रमाणग्रंथातील पंक्तींचे इतरांनी दिलेले विवरण मान्यसिद्धांताला विरोधी असल्यास त्याचे खंडन करून सिद्धांताला अनुकूल विवरणही दिलेले असते. पण टीकाग्रंथांचा मुख्य उद्देश विवरण हा असतो, तर निबंधग्रंथाचा मुख्य उद्देश एकेका विषयाचे सर्वांगीण प्रतिपादन हा असतो. व्याकरणशास्त्रातील निबंधग्रंथांचे ढोबळ मानाने शब्दप्रक्रियात्मक आणि अर्थप्रक्रियात्मक असे दोन प्रकार पडतात. मूळ धातू किंवा शब्द, त्याला जोडावयाचा प्रत्यय, त्यामुळे होणारे आगम, गुणवृद्धी, दीर्घ संप्रसारण, इत्यादी बदल ह्यासंबंधीची सूत्रे अगर नियम लागू करून एखादा शब्द बनविणे ह्या मांडणीला शब्दप्रक्रिया म्हणतात, शब्दापासून किती अर्थ समजून येतात, त्यांचे परस्परसबंध, शब्दाचे वास्तव स्वरूप, शब्दापासून कळून येणाऱ्या अर्थाचे स्वरूप, शब्द आणि अर्थ यांचा संबंध, वाक्यातील शब्दार्थांचे परस्परसंबंध, प्रत्ययार्थ आणि प्रकृत्यर्थ यांचे संबंध, कळून येणाऱ्या अनेक अर्थांतील गौणमुख्य भाव, उपसर्गाचा अर्थ, धातूचा सकर्मक-अकर्मकपणा वगैरे विषयांचा विचार म्हणजे अर्थप्रक्रिया, उदाहरणार्थ 'गच्छति' हे शब्दरूप 'गम्' धातूला तृतीयपुरुषी एक-

वचनी प्रत्ययांपैकी 'ति' प्रत्यय लागून अनुक्रमे पा. ३.२.१२३, ३.४.७८ यांनुसार आणि 'गम्'च्या जागी 'गच्छ' असा बदल होऊन (अनुक्रमे ३.१.६८, ७.३.७७, ६.१.७३, ८.४.४० यांनुसार) बनते. ही सर्व फोड म्हणजे शब्दप्रक्रिया. या उलट या रूपामुळे गमनक्रिया, एकसंख्या, तृतीयपुरुषी कर्ता, वर्तमानकाल असे पाच अर्थ समजून येतात. त्यांचा विचार म्हणजे अर्थप्रक्रियेचा विचार. त्यापैकी गमनत्व हा अर्थ सर्व-सामान्य श्रोत्यांच्या जाणिवेत व्यक्तपणे भासणार नाही, पण शास्त्रसिद्धांतानुसार तो मान्य करावा लागतो. इतर चार अर्थ कोणत्याही जाणकार श्रोत्याला कळतातच, म्हणूनच 'अहं गच्छति किंवा 'तौ गच्छति' असे प्रयोग त्याला खटकतात. ह्या सगळ्या अर्थांचा एकमेकांशी संबंध काय ? ते अर्थ एका कुटुंबातील अनेक व्यक्तीं-सारखे नातेवाईक आहेत, की बसमधील माणसाप्रमाणे अगदी तुटक आहेत, त्यातील वर्तमानकाळ ह्या अर्थाचा संबंध क्रियेशी, कर्त्याशी, का संख्येशी आहे ? क्रियेशीच का ? कर्त्याशी का नाही ? ह्या विषयाची मांडणी आणि साधकबाधक चर्चा अर्थ-प्रक्रियात्मक ग्रंथांत केलेली असते.

ही विषयविभागणी अगदी हवाबंद डब्यासारखी काटेकोर नाही, कारण भाषिक व्यवहारात शब्द आणि अर्थ हे घटक एकमेकांशी इतके बिलगून असतात, की एकाचा विचार करताना दुसऱ्याला सर्वस्वी टाळता येतच नाही, म्हणून ही विभागणी प्राधान्याने मांडलेल्या विषयानुसार केलेली आहे. **समासचक्र, समासमंजरी, ज्ञापक-समुच्चय, कृदवृत्ती, तद्धितकोश, तिडन्तशिरोमणी, परिभाषासूचन, परिभाषेन्दुशेखर** वगैरे निबंधग्रंथ मुख्यत्वेकरून शब्दसिद्धीच्या संबंधाने विचार करणारे आहेत, तर **वाक्यपदीय** (भर्तृहरी, इ. स. पाचवे शतक), **स्फोटसिद्धि, स्फोटचंद्रिका, स्फोट-निरूपण, वैयाकरण भूषण** (कौण्डभट्ट, सतरावे शतक), **वैयाकरण–सिद्धांतलघुमंजूषा** (नागोजी भट्ट, अठरावे शतक), इत्यादी अनेक ग्रंथ अर्थप्रक्रियात्मक आहेत. हे सर्व निबंध ग्रंथ, आकरग्रंथ व टीकाग्रंथ यांमधील (अनेक) वचने प्रमाण म्हणून देत असतात.

शब्दप्रक्रिया ही शब्दाच्या बाह्य आणि व्यक्त स्वरूपाशी संबंध असल्याने तिचे आकलन सामान्य अभ्यासकालाही अगदी रोकडे होते. म्हणून व्याकरण म्हणजे शब्दसिद्धी असा सार्वत्रिक समज आहे. आणि तसे पाहता तो योग्यही आहे. सूत्र-ग्रंथापासून सर्वच ग्रंथांत तीच प्रक्रिया विस्ताराने दिलेली आहे. तथापि, अर्थप्रक्रियेचा प्रारंभही सूत्रग्रंथापासूनच पण काहीशा अस्फुट स्वरूपात होतो. वार्तिके व महाभाष्य ह्या आकरग्रंथातही तिचा वापर जागोजाग विखुरलेला विपुल प्रमाणात आढळतो. आकर ग्रंथापासून त्यासंबंधीचे धागे घेऊन, आणि इतर दार्शनिकांची त्यासंबंधीच्या विचारांची योग्य दखलघेऊन भर्तृहरी वगैरे ग्रंथकारांनी वैयाकरणाचे त्यासंबंधीचे सिद्धांत सप्रमाण मांडण्याचा जबरदस्त प्रयत्न केला, पण त्याच्या जटिल, सूक्ष्म, आणि आपातत:





अनुक्रमणिका

वाटणाऱ्या निष्फळपणामुळे त्याबाबतची परंपरा राहिली नाही. सध्या इतर देशांतील भाषाशास्त्राभ्यासकांना त्या अर्थप्रक्रिया ग्रंथांचे विशेष आकर्षण वाटू लागले आहे, आणि त्यामुळे का होईना, भारतातील अभ्यासकही हळूहळू ह्या विभागाच्या अभ्यासाकडे वळत आहेत, हे एक शुभचिन्ह असून, केवळ संस्कृतच्याच नव्हे, तर इतर भारतीय भाषांच्या नवीन अभ्यासकांनी ते अर्थप्रक्रियात्मक विचाराचे दालन जरूर अभ्यासावे, तौलनिक दृष्टीने परीक्षण करावे व शेकडो वर्षे उपेक्षित विभाग उजेडात आणावा, अशी आपल्या या प्राचीन परंपरेची जणू अत्यंत निकडीची मागणी आहे.

२

आकरग्रंथ हे स्वयंप्रमाण आहेत. त्यांनी केलेली विधाने 'असे का ?' हा प्रश्न मनातही न आणता प्रमाण म्हणून स्वीकारणे ही टीका आणि निबंध-ग्रंथांची बांधिलकी किंवा आचारसंहिता. विवरणापलीकडे त्यांना स्वातंत्र्य नाही, ही आचारसंहिता प्राचीन सर्वच टीकाकारांनी शिरोधार्य मानली असली, तरी आडवळणाने अगर मागील दाराने त्यांनी स्वातंत्र्याचा मानवी हक्क पुरेपूर उपभोगलेला आहे, असे आढळून येते. टीकाकारांची ही स्वातंत्र्यलालसा केवळ व्याकरणशास्त्रातच नाही, तर इतरही प्राचीन शास्त्रांमध्ये दिसून येते. वरून शब्दप्रामाण्य, आणि निष्ठा, तर आतून बंडखोरी, असा हा प्रकार जाणवतो.

भाषा हा मनुष्यव्यवहार आहे. गणितासारखे त्याचे आखीवरेखीव स्वरूप राहणे शक्यच नाही. महर्षी पाणिनि असो अगर महाभाष्यकार पतंजली असो, भाषाव्यवहार त्यांच्या नियमांच्या सर्वस्वी अधीन सतत राहील, हे कधीच शक्य नाही. शिवाय असे काही शब्द संस्कृत भाषेत फार प्राचीन काळापासून वापरात आहेत—इतकेच काय, खुद्द सूत्रकार पाणिनीनेही ते वापरले आहेत— उदाहरणार्थ, कन्या, व्यवस्था, प्रश्न, अन्न, सर्वनाम, इत्यादी शब्द. पण त्याच्याच यंत्रणेमुळे ते चुकीचे म्हणावे लागतात, तर मालाभिः, लिखितुम्, दंष्ट्रा असे रोजच्या व्यवहारात सर्रास वापरले जाणारे, तसेच प्रसिद्ध वाङ्मयात वापरलेले कित्येक शब्द किंवा रचना आकरग्रंथातील नियमानुसार सिद्ध होत नाहीत.

सरळ मार्गाने सिद्ध न होणाऱ्या पण शिष्टमान्य अशा शब्दांच्या सिद्धीसाठी—म्हणजेच व्याकरणशास्त्राकडून मान्यतेसाठी—पुढे दिलेले आडवळणी मार्ग जागोजाग टीकाकारांनी स्वीकारलेले आढळतात :

(१) योग विभाग म्हणजे एका सूत्राचे दोन तुकडे करून दोन विधाने मिळविणे.
(२) आकृतिगण—परंपराप्राप्त शब्दसंग्रहात भर घालणे.
(३) प्रश्लेष—सन्धिनियमानुसार जादा वर्ण मिळविणे.

(४) बाहुलक–एखादा नियम शिथिल मानणे.

(५) ज्ञापक–सूत्रकारादीच्या वरपांगी व्यर्थ ठरणाऱ्या विधानावरून इष्ट विधान मिळविणे.

(६) निर्देश–आकरग्रंथातील वापर दाखवून देणे.

(७) अपकर्ष–पुढील सूत्रातील शब्द मागील सूत्रात खेचून आणणे.

(८) मण्डूकप्लुति–मागील सूत्रातील शब्द मध्यंतर सूत्रात न आणता उडी मारून पुढील सूत्रात नेणे.

(९) व्यवस्थित विभाषा–विकल्पाला मर्यादा घालणे.

(१०) एकशेष–सारख्या शब्दांचा एकत्र उल्लेख मानणे.

(११) अनभिधान–भाषेत वापर नसल्याने शास्त्रमान्य शब्दप्रयोग नाकारणे.

(१२) स्वरित प्रतिज्ञा–सूत्रातील एखादा शब्द स्वरित मानणे.

(१३) यौगिक अर्थ स्वीकार–शब्दाचा प्रसिद्ध रूढ अर्थ सोडून व्युत्पत्तीने मिळणारा पण अप्रसिद्ध अर्थ घेणे.

या आणि अशा अनेक युक्त्या, खरे तर क्लृप्त्या भाष्यकारापासूनच अगदी राजमान्य झालेल्या आहेत.

आचार्य वामन या पंडिताने इसवी सनाच्या आठव्या शतकात लिहिलेल्या **काव्यालंकारसूत्राणि** ह्या सूत्रग्रंथात पाचव्या अध्यायातील दुसरे संपूर्ण अधिकरण शिष्टप्रयुक्त पण व्याकरणशास्त्राने सिद्ध न होणाऱ्या शब्दांच्या सिद्धीसाठीच योजलेले आहे. एक्याण्णव सूत्रे त्या अधिकरणात त्या उद्देशाने रचलेली आहेत. इसवी सन तेराव्या शतकात शरणदेव नावाच्या विद्वानाने **दुर्घटवृत्ति** हा स्वतंत्र ग्रंथ अशा शब्दांच्या सिद्धीसाठी लिहिला आहे. दुर्घट म्हणजे घडविण्यास, शास्त्रानुसार सिद्ध करण्यास कठीण अशा सुमारे एक हजार शब्दांच्या सिद्धीसाठी पाणिनीच्या सुमारे पाचशे सूत्रांचे विवरण काहीशा वेगळ्या अगर आडमार्गाने त्या ग्रंथात केलेले आहे. आणि ते सर्व शब्द-प्रमाणभूत पाणिनीच्या गोमुखीतूनच मिळतात, असे सिद्ध केले आहे.

ह्या पैकी काही शब्द पाणिनीच्यापूर्वी, काही खुद्द पाणिनीच्या काळी, तर काही पाणिनीनंतर शिष्ट प्रयोगात आले असतील. काही असले, तरी त्यांच्या मान्यतेसाठी नवीन विधान करणे हा सरळ उपाय.

वार्त्तिककार बहुतेक ठिकाणी ह्या सरळ मार्गाचाच अवलंब करतात. त्या उलट महाभाष्यकार मात्र वर दिलेले आडमार्ग स्वीकारून नवीन विधाने धुडकावून देतात आणि ' सूत्रे एवेव हि तत्सर्वं यद वृत्तौ यच्च वार्त्तिके ' (संदर्भ : वार्त्तिक २.३ जे विवरणामध्ये आणि जे वार्त्तिकामध्ये सांगितले आहे ते सर्व सूत्रामध्येच असते.) अशी सूत्रकारासंबंधी निष्ठा दाखवतात. त्यामुळे सूत्रातील उणिवा दाखविणाऱ्या वार्त्तिकांचे खंडन करून सूत्रांच्या समर्थनासाठीच शेषाने पतंजलीच्या रूपाने अवतार

घेतला, अशी प्राचीन परंपरेची दृढ श्रद्धा झालेली आहे.

'न हि वेदप्रतिपादितेऽ, र्थे अनुपपन्ने वैदिकांना मतिः खिद्यते, किंतु तदुपपादनमार्ग मेव चिंतयति' (**सर्वदर्शनसंग्रह**, अभ्यंकर टीकेसह, पुणे : भांडारकर संस्था, पृ.४१५. (वेदातील विधान (इतर प्रमाणांनी) विसंगत होत असेल, तर वेदावर निष्ठा असणाऱ्याची बुद्धी गुंग होत नाही. तर त्या विधानाची उपपत्ती लावण्याचा मार्गच ती धुंडाळते) असे सायणमाधवांनी म्हटले आहे. ती वचननिष्ठा भाष्यकारादींनी सूत्राबद्दल धरलेली आहे. व्याकरणशास्त्र म्हणजे व्यवहारमान्य भाषेचे दर्शन. व्यवहारमान्य भाषा व व्याकरण ह्या दोहोंमध्ये विसंगती आढळली तर सूत्रप्रामाण्यवादी डोक्याला हात लावून बसत नाही तर सुसंगती साधण्यासाठी आपली सर्व बुद्धी पणाला लावतो व दोहोंमध्ये सुसंगती साधतो. मात्र मान्य व्यवहाराला चुकीचा म्हणणे कदापि शक्य नसल्याने शास्त्राशी सुसंगती साधण्यासाठी मुक्या बापड्या सूत्रांनाच तो वेठीस धरतो. काही वेळेस टीकाकारांच्या अजब कसरतीने अभ्यासकांना आगळा आनंद लाभतो, हे जरी खरे, तरी काही ठिकाणी शब्दच्छल, चिरफाड, अर्थाचे अनर्थ पाहून सुजाण अभ्यासकाला सूत्रकारांचीच कीव येते, सूत्रकार प्रत्यक्ष अवतरला, तर तो 'येथे सूत्रकार चुकला' असे स्वच्छ म्हणा, पण अशी कुतरओढ थांबवा' असे खास म्हणेल, असेच त्या अभ्यासकाला वाटू लागते.

टीकाकारांच्या ह्या वैध– अवैध, सरळ– वेड्यावाकड्या खटाटोपात एक गोष्ट मात्र अत्यंत योग्य आणि नवीन अभ्यासकांना समाधानाची म्हणूनच अवश्य अनुसरणीय स्पष्टपणे दिसते. ती म्हणजे व्याकरणाची मान्य भाषेशी कायमची बांधिलकी. व्याकरण, मग भले ते खुद्द ईश्वरानुग्रहाने एखाद्या महर्षीने रचलेले असो अगर एखाद्या अवतारी पुरुषाने विवरण करून सांगितलेले असो, ते भाषेशी प्रतारणा करू शकत नाही. व्याकरणाच्या ह्या व्यवहाराशी बांधिलकीतूनच 'प्रयोगशरणाः वैयाकरणाः' अशी म्हण रूढ झाली आहे.

३

पाणिनीय व्याकरण–परंपरेतील ग्रंथांचे प्रकार, त्यांचे स्वरूप आणि त्यांनी बजावलेली कामगिरी ह्या बाबी सामान्यपणे वर विवेचिल्या आहेत. ह्यापुढे खुद्द पाणिनीच्या पुढील समस्या आणि त्या दूर करण्यासाठी त्याने योजलेला उपाय ह्यासंबंधात विचार करावयाचा आहे.

'परदुःख शीतल' अशी मराठी म्हण आहे. त्याच धोरणाने 'परकालीन समस्या किरकोळ' असे म्हटल्यास वावगे होणार नाही. प्रत्येकाला आपल्या काळातील अडचणी ह्या अभूतपूर्व अशा वाटतात. जो तो म्हणतो, तो काळ बरा होता. पण आज जीवन इतके अडचणींनी भरले आहे, की ह्याला उपमाच नाही. आजचा काल

म्हणजे अगदी ह्यासम हा!' ही समजूत बरोबर नाही. प्रत्येक काळी त्या त्या काळच्या अशा खास समस्या– काही तात्त्विक, तर काही व्यावहारिक असतात.

पाणिनीच्या पुढे दोनही प्रकारच्या समस्या होत्या. 'वर्णसमूहः पदम्', 'पदसमूहो वाक्यम्' हे भाषेचे स्वरूप. त्यामुळे व्याकरण म्हणजे वर्ण, पदे, आणि वाक्ये यांचे विवेचन. ह्या तीन घटकांपैकी व्याकरणाचा मुख्य विषय कोणता? तसेच विवेचन कोणत्या पद्धतीने आणि किती मर्यादेने करावे? ह्या विषय आणि पद्धत यासंबंधीच्या समस्या त्याच्यापुढे होत्याच.

वर्णविवेचन हा व्याकरणाचा विषय बिलकूल नाही. तो शिक्षाग्रंथ किंवा प्रातिशाख्यांचा विषय. पद किंवा वाक्य यांच्या सिद्धीच्या संदर्भात जरूर तेवढाच वर्णांचा विचार येथे मांडावयाचा. सूत्रकाराने वर्णविचारासंबंधीचे हे धोरणच वार्त्तिककारांनी 'वृत्तिसमवायार्थः अनुबंधकरणार्थश्च' (पस्पशा १५–१६) (शास्त्ररचनेत सुटसुटीतपणा यावा, म्हणून वर्ण सांगितले आहेत, आणि खुणा जोडण्यासाठी) ह्या वार्त्तिकांनी स्पष्ट केलेले आहे. महाभाष्यकारांनी 'तस्यादित उदात्तमर्धह्रस्वम्' १.२.३२ सूत्रावर 'व्याकरणं नामेयमुत्तरा विद्या' (व्याकरणशास्त्र (प्रातिशाख्य शिक्षा ह्यांच्या) नंतर अभ्यासावयाचे असते), असे म्हटले आहे. इतरही ठिकाणी वर्णविवेचन हा व्याकरणाचा विषय नाही, असे सूत्रकारांचे धोरणच त्यांनी समर्थिले आहे.

पाणिनीच्या पूर्वी यास्काचार्यांनी निरुक्तात 'पदप्रकृतिः संहिता' असे संहितेचे लक्षण केलेले आहे. पदप्रकृतिः ह्या लक्षणाचे दोन अर्थ संभवतात, असे टीकाकारांनी म्हटले आहे. 'पदानां प्रकृतिः' असा षष्ठीतत्पुरुष केल्यास वाक्य मूळ प्रकृती आणि पदे विकृती असे ठरते आणि 'पदानि प्रकृतिः यस्याः' असा बहुव्रीही मानल्यास पदे मूळ प्रकृती आणि वाक्य विकृती असे मत सिद्ध होते. पदे हा मूळ आणि मुख्य घटक हे मत पाणिनीने व्याकरणशास्त्राच्या संदर्भात घेतलेले आहे. महाभाष्यकार 'वृद्धिरादैच्' (१.१.१) सूत्रावर म्हणतात. 'संस्कृत्य संस्कृत्य पदान्युत्सृज्यन्ते' तेषां यथेष्टमभिसंबन्धो भवति' (तयार करकरून (येथे) पदे दिली जातात, त्यांचे विशिष्ट क्रमाचे वाक्य वक्त्याच्या इच्छेनुसार बनते).

पद म्हणजे विभक्त्यन्त (सुबन्त) आणि क्रियापदे (तिङन्त). नामे, सर्वनामे, विशेषणे, आणि अव्यये यांना विभक्तिप्रत्यय जोडून सुबन्ते बनतात, तर धातूंना पुरुषवाचक प्रत्यय जोडून क्रियापदे बनतात. ही कल्पना अगर मांडणी पाणिनिपूर्व भाषाभ्यासकांनी मान्य केलेली होती. इतकेच नव्हे, तर भाषेतील हर एक शब्द धातूला काही प्रत्यय जोडूनच तयार झालेला आहे, असे आग्रही मत काही वैयाकरणांचे होते. पण पाणिनीने ते स्वीकारले नाही व झिडकारलेही नाही. त्याबाबत त्याने वास्तववादी मध्यममार्ग स्वीकारला. ज्या शब्दामध्ये धातू आणि प्रत्यय यांची व त्यांच्या अर्थाची जाण स्पष्ट आहे, तेवढेच शब्द व्याकरणाने सिद्ध करावयाचे,

इतर शब्द जात्या सिद्ध म्हणजे अव्युत्पन्न मानायचे, असे धोरण त्यांनी स्वीकारले. ज्यांना त्यांची सिद्धी करण्याचा खटाटोप करायचा आहे, त्यांनी खुशाल करावा. पण तो व्याकरणाचा प्रांत नाही. व्याकरणशास्त्राने त्याबाबत उदासीन राहावे, असे त्याने स्पष्ट सांगितले आहे.

संस्कृत भाषेची ठेवण पाहिल्यास हे लक्षात येते, की एकाच मूळ धातूपासून अर्थाचे वैविध्य व्यक्त करणारी शेकडो रूपे हा या भाषेचा विशेष. इंग्रजीमधील go धातूची रूपे go, goes, went, going, gone अशी फक्त पाचच रूपे प्रसिद्ध आणि वापरात आहेत. संस्कृतमधील गम् धातूची क्रियापदरूपे परस्मैपदी, क्वचित आत्मनेपदी, प्रयोजक गमयति वगैरे, इच्छार्थक जिगमिषति वगैरे, पौनःपुन्यर्थक जंगम्यते, कर्मणि गम्यते, कृदन्ते गन्तृ, गन्तव्य, गम्य, गमनीय, गच्छत्, गत, गतवान्, अधिगम, गामिन्, गन्तुम्, गामम्, गत्वा, आगम्य, गति, गमन, गमक अशी ही साखळीलाटरीप्रमाणे शेकडो होतात. जरी व्याकरणनियमानुसार बनणारी सगळीच रूपे प्रत्यक्ष वापरात इतकी असणार नाहीत, हे मान्य केले, तरी शेकडो प्रत्ययांच्या बळाने साधलेले रूपबाहुल्य आणि अर्थवैविध्य ही वस्तुस्थिती आहे. पाणिनीने ती लक्षात घेतली आणि अष्टाध्यायीतील तीन, चार, आणि पाच अध्यायांत प्रत्ययांचे विधान केले. एकूण सुमारे चार हजार सूत्रांपैकी निम्मी सूत्रे ह्या तीन तीन अध्यायांत आहेत. संस्कृत भाषेतील प्रत्ययांचे महत्त्व पाणिनीप्रमाणे परंपरेनेही लक्षात घेतले आहे. ह्या तीन अध्यायांना विधित्रयी (मुख्य विधान करणारे) व राहिलेल्या पाच अध्यायांना– ज्यांत संज्ञा, संधी, आदेश, आगम, स्वर वगैरे सांगितलेले आहेत–विधिशेष (पूरक, अंगभूत) असा विभाग टीकाकारांनी केलेला आढळतो

पाणिनीने व्याकरणशास्त्रात वर्णांना स्थान नाही, अत्यंत रूढ शब्द अव्युत्पन्न आहेत, बोलभाषा आणि बोलण्यातील स्वराघात हा व्याकरणाचा विषय आहे, हे निर्णय घेतले आणि त्या मर्यादेत सर्व मांडणी केली. ह्या संबंधात त्या वेळच्या काही पठडीच्या विद्वानांचा विरोध झाला असणारच. पण ह्या सर्व निर्णयांशी तो बांधील राहिला.

निरुक्तकार यास्क म्हणतात, की निरुक्त ही व्याकरणाची परिपूर्णता आहे ('व्याकरणस्य च कार्त्स्न्यम्', निरुक्त १.१५). म्हणजे सर्व शब्दांच्या व्युत्पत्तीखेरीज व्याकरणाला पूर्णता नाही. तर काही प्राचीन वैयाकरणांचे असे ठाम मत असावे, की वर्ण हा भाषेचा मूल घटक. त्यांचा सर्वांगीण विचार व्याकरणात अटळच. कारण व्याकरण म्हणजे शब्दांचे अनुशासन. पाणिनीने वर्ण आणि शब्दव्युत्पत्ती अर्थात निरुक्त हा व्याकरणाचा प्रांत नव्हे. असे पक्के केले आणि ह्या शास्त्रीय समस्या निर्धाराने सोडविल्या आणि व्याकरणशास्त्र म्हणजे मुख्यत्वेकरून पदशास्त्रच ही विषयमर्यादा निश्चित केली.

ह्या विषयमर्यादेच्या बाबतीत पूर्वमीमांसा म्हणजे कर्मकाण्ड आणि उत्तरमीमांसा म्हणजे ज्ञानकाण्ड ह्या दोन दर्शनांचा दाखला त्या कालाच्या संदर्भात विचारासाठी उपयोगी पडेल. वेदांचा उपनिषद्–विभाग ही स्वतंत्र ज्ञानशाखा नाहीच, तर यज्ञ-यागादी कर्मानुष्ठान सांगणाऱ्या ब्राह्मणभागाचे ते पूरक अंग आहे. उपनिषदे ही यज्ञयागादी कर्माने स्वर्गादी फळे मिळवणाऱ्या आत्म्याचे स्वरूप सांगणारी, तर काही ठिकाणी त्याची स्तुती करणारी अर्थवादरूप म्हणून कर्माची अंगरूपच आहेत,स्वतंत्र नाहीत, असा प्राचीन वैदिकांचा ठाम सिद्धांत. वेदान्त्यांनी अधिकारभेद, फलाभेद, इत्यादी कारणांनी ती कर्मांगभूत नाहीत, ती स्वतंत्र ज्ञानशाखा म्हणून आहेत. इतकेच काय, तीच परा विद्या. इतर सर्व ज्ञानशाखाच तिच्या पूर्वतयारीच्या म्हणून अपरा हा सिद्धांत मांडला. नंतरच्या सर्व आचार्यांनी आणि टीकाकारांनी त्यांचे समर्थन करून कर्मकाण्डाच्या पारतंत्र्यातून ह्या वेदांतविद्येला बाहेर काढून अगदी स्वतंत्र स्थान मिळवून दिले. हीच कामगिरी पाणिनीने वर्ण, व्युत्पत्ती, वगैरेंपासून व्याकरणशास्त्राला अलग करून बजावली आणि त्या मर्यादेत पदशास्त्र असे स्वतंत्र शास्त्र उभारले, असे म्हणावे लागते.

ह्या समस्यांचा पाणिनीच्या अष्टाध्यायीत अगदी दुरून अगर अस्पष्टपणेही उल्लेख नाही, हे खरे. शास्त्राच्या अत्यंत संक्षेपासाठी अगदी मुद्द्याचे तेवढेच सांगायचे, चर्चा, वादविवाद, मतमतान्तरे कटाक्षाने टाळायची, असा सूत्रकारांचा विशेष स्वभाव असल्याने त्यांनी ह्या समस्यांसंबंधी उल्लेख केला नाही. वार्त्तिककार, भाष्यकारादिकाकारांनी सूत्रकारापुढील समस्यांची उकल जागोजाग केलेली आढळते. त्यावरूनच विषयमर्यादेसंबंधी समस्या पाणिनीपुढे जरूर होत्या व त्या त्याने उल्लेख न करता प्रत्यक्ष कृतीनेच दूर केल्या, असे समजणे वावगे होणार नाही.

शास्त्ररचनेसंबंधीही त्याने आपले धोरण प्राचीन विस्तारपद्धतीपेक्षा संक्षेपपद्धतीचे अर्थात सामान्य नियम आणि विशेष नियम (म्हणजेच उत्सर्ग आणि अपवाद) असे योजले. त्यांबद्दलही त्या वेळच्या विद्वानांमध्ये अनुकूल–प्रतिकूल प्रतिसाद उमटले असावे, असे महाभाष्यातील विवेचनावरून ताडता येते.

## ४

शास्त्रीय समस्या आणि त्याबद्दलचे पाणिनीचे निर्णय ह्यासंबंधी थोडक्यात विवेचन झाले. त्या काळी व्यावहारिक समस्या त्या काय असणार ? असे आजच्या नवीन व्यावहारिक समस्याच डोळ्यांपुढे बाळगणारा लेखक विचारील. कारण एखादा ग्रंथ मोठ्या प्रयत्नाने प्रचंड व्यासंगाने लिहून तयार झाला, तरी तो जाणकारांच्यापुढे हजर करण्यास अनेक अडचणींना सध्या तोंड द्यावे लागते. प्रकाशक मुद्रक, समीक्षक, वितरक यांना तोंड देत प्रसिद्धिमाध्यमाच्या सर्व अग्निदिव्यांतून,

वाट कशी काढायची, ह्या आजकालच्या व्यावहारिक समस्या त्या वेळी खासच नव्हत्या. पण त्या काळी व्यावहारिक समस्याच नव्हत्या. हे म्हणणे म्हणजे एकूण मानवी जीवनाचे खरे सार्वकालीन स्वरूपच न कळल्याची कबुली देण्यासारखे ठरेल. कारण शास्त्रीय समस्यांप्रमाणे पण व्यावहारिक समस्या ही सुद्धा सनातन बाबच आहे.

पाणिनीच्या काली वाङ्मय टिकविण्याचे एकमेव साधन म्हणजे पाठ करण्याची परंपरा. त्या काळी लिपी नसावी किंवा नवीन माहीत झालेले साधन म्हणून फार वापर नसावा. कोणत्याही नवीन साधनाचा वापर करण्यात श्रद्धावान पंडित मोकळ्या मनाने त्या काळी राजी नसत. आज सुधारणांनी सर्व वातावरण दुमदुमलेल्या विसाव्या शतकातही धार्मिक ग्रंथांच्या छपाईस विरोध झाला, असे म्हणतात. अजूनही विशिष्ट आकाराचे ग्रंथच (पोथी) धार्मिक परंपरेत मान्यता मिळवतात. अडीच हजार वर्षांपूर्वीची सर्व जीवनावरील धार्मिक जबरदस्त पकड लक्षात घेतली, तर लिपिबद्ध वाङ्मयाला विरोध खासच झाला असेल. लिपिवाङ्मयाचा अभ्यास म्हणजे अत्यंत पाखंडपणाच. मौखिक परंपरा हीच शिष्टसंमत, योग्य. पाणिनीय शिक्षेमध्ये (३२) लिखितपाठक म्हणजे अधम विद्यार्थी— असे विधान आहे. त्यामुळे मौखिक पाठपरंपरेत ज्याला स्थान, तेच वाङ्मय टिकणार, तेच शिष्टमान्य, तेच परंपरेने अभ्यासले जाणार, तेच सनातन.

लिपीच नव्हती, त्या काळात मुख्य परंपरेने वाङ्मय टिकविण्याचा पराकोटीचा प्रयत्न भारतीयांनी केला. त्या प्रयत्नाला जगात तोड नाही. त्यासाठी माणसाची मर्यादित शक्ती लक्षात घेऊन अधिकाधिक वाङ्मय टिकून राहावे, म्हणून प्राचीन वैदिक वाङ्मयाचे विभाग करून वेगवेगळ्या विद्यावंशांकडे ते ते विभाग सोपविले. त्यामुळे वैदिक वाङ्मयाबद्दल अभ्यासू समाजामध्ये श्रद्धेची भावना व त्या भावनेतून आपल्या विद्यावंशाकडे आलेले ते ते विभाग उत्तम रीतीने शेकडो वर्षे टिकवून ठेवण्याची जिद्द समाजात दृढमूल झाली. त्यामुळे वैदिक वाङ्मयाच्या अभ्यासाला विशेष उपयोगी प्रातिशाख्य, निरुक्त, कल्प, इत्यादी वाङ्मयही परंपरेने जतन करण्याची जिम्मेदारी समाजाने उचलली. पण ही पारंपरिक श्रद्धा इतर लौकिक वाङ्मयाबद्दल नसल्याने केवळ लौकिक स्वरूपाचे वाङ्मय 'किती एक ते जन्मले आणि मेले' ह्या जगरहाटीत सामील झाले. वेद आणि वेदाङ्ग वाङ्मय ज्या काळात रचले गेले, त्या काळातसुद्धा वाल्मीकि, भास, कालिदास, बाण यांचे पूर्णावतार खासच असणार व स्वान्तः सुखासाठी तसेंच दुसऱ्यांच्या रंजनासाठी ललित वाङ्मयही त्याने रचले असणार, पण श्रद्धेअभावी ते त्या त्या कालापुरतेच ठरले. त्याचा काहीसा मागमूस मात्र टिकून राहिलेल्या वैदिक वाङ्मयात मिळतो.

पाणिनीला त्याच्या वेळी त्या वेळच्या उत्तर भारतात लोकव्यवहारात असलेल्या

भाषेचे व्याकरण तयार करावे आणि ते चिरकाल परंपरेत टिकावे, अशी महत्त्वाकांक्षा होती. पण वैदिकेतर वाङ्मय त्या त्या पिढीतही टिकत नव्हते, ही वस्तुस्थिती अगदी रोकडी दिसत होती. तसेच आजपर्यंतच्या वैदिक वाङ्मयाच्या पाठांतराच्या ओझ्याने विद्यावंश-परंपरा इतकी भारावलेली होती, की मोठ्या आकारात नव्याने तयार झालेले वेदासंबंधीचे वाङ्मयसुद्धा त्या परंपरेच्या माध्यमाने टिकेल, ह्याचीही खात्री नसावी, अशा स्थितीत लौकिक भाषेच्या व्याकरणाला 'पारंपरिक स्वाध्याय' म्हणून विद्वानांमध्ये कसे स्थान मिळणार आणि ते चिरंतन तरी कसे होणार ?

कोणतीही शास्त्रीय समस्या, व्यासंग, विशेष शैली, विशेष गुणवत्ता, इत्यादी व्यक्तिगत आणि प्रयत्नसाध्य गुणांनी सोडविणे शक्य असते. पण व्यवहार हा इतका गुंतागुंतीचा असतो, की त्यातील समस्या सोडविण्यास व्यक्तिगत व्यासंग, बुद्धी, शैली, इत्यादींचा काही उपयोग होत नाही.

वैदिक भाषा आणि पाणिनीचे वेळी प्रचलित भाषा ह्या दोन, की एक ? पाणिनीचे ह्यासंबधी मत काय असावे ? पाणिनी, वार्त्तिककार वगैरे टीकाकार प्रचलित भाषेला 'भाषा' हा सामान्य शब्द वापरतात. विशेषनाम असे काही वापरत नाहीत आणि वैदिक भाषेच्या संबंधात वेद, मन्त्र, ऋषि, यजुस् ब्राह्मण, छन्दस्, इत्यादी शब्द वापरतात. अष्टाध्यायीत एकूण सुमारे चार हजार सूत्रांपैकी खास वैदिक भाषेसंबधीची सूत्रे फक्त सुमारे ३०० आहेत. उदात्त वगैरे स्वरासंबंधी विधान करणारी सुमारे ४०० सूत्रे आहेत. उदात्तादी स्वर हा विषय वेदांतच असल्याने ती स्वरसूत्रे ही वैदिकच, असा काही विद्वानांचा समज आहे. पण तो निखालस चुकीचा आहे. प्राचीन टीकाकारांनाही ते म्हणणे मान्य नाही. स्वरविधायक सूत्रामध्ये 'वेदे छन्दसि,' असा अधिकार नाही. शिवाय उदात्तादि स्वर हा बोलभाषेचाच खरा विशेष असल्याने स्वरविधायक सूत्रे केवळ वेदांसंबंधी मानणे हें भाषेच्या स्वभावाशी पूर्ण विसंगत आहे. तसेच काही स्वरविधायक सूत्रे केवळ वेदातील तर काही केवळ भाषेतील असे सूत्रकार आणि टीकाकार सांगतात. त्यामुळे अष्टाध्यायीतील फक्त तीनशेच सूत्रे म्हणजे तेरावा भाग वेदांसंबंधीचा आहे. ही वैदिक सूत्रे वेदांचा प्रचलित भाषेपेक्षा वेगळेपणा दाखवितात. तथापि, अगणित वैदिक शब्द आणि रचना पाणिनीय व्यवस्थेनुसार जमतच नाहीत. आणि स्वतःची ही असमर्थता स्वतः पाणिनीनेच अनेक ठिकाणी मोकळ्या मनाने मान्य केलेली आहे. 'बहुलं छन्दसि' (वेदामध्ये हा नियम अगदी ढोबळपणे लागू पडतो) असे अकरा ठिकाणी पाणिनी म्हणतो. इतरही अनेक नियमांबाबत तो स्वतः किंवा टीकाकार ह्या व्याकरणाचा वेदाबाबत लंगडेपणा मान्य करून तो पूर्वी उल्लेखिलेल्या विविध आडमार्गी उपायांनी दूर करण्याचा प्रयत्न करीत असतात. अशी पाणिनीय व्याकरणाची वेदभाषेबाबत अगदी दयनीय

अवस्था आहे. अशा इतक्या दुर्बल अनुकंपनीय अवस्थेत पाणिनि दुर्धर वैदिक भाषेच्या व्याकरण–प्रांतात शिरलाच कशाला ? तसेच ज्या ग्रंथाचा फक्त तेरावा भाग वेदांसंबंधी आहे, व तोही अगदीच ठिसूळ, जो ग्रंथ स्वतःची वैदिक व्याकरणासंबंधी असमर्थता अनेकवार स्पष्ट सांगतो, त्याला वेदाङ्ग असे उन्नत स्थान वैदिक परंपरेने तरी का दिले ? असे अनेक प्रश्न वर्षानुवर्ष माझ्या मनात बव्हंशी अनुत्तरित राहिलेले आहेत. अलीकडे वाचनाने आणि चिंतनाने काही संभाव्य उत्तरे अंदाजली ती पुढे देत आहे. नवीन अभ्यासकांनी त्यांबाबत विचार करून निर्णय घ्यावा हा उद्देश.

पाणिनि वैदिक भाषेसंबधीची स्वतःची उणीव पूर्ण जाणून होता. त्याला केवळ लौकिक प्रचलित भाषेचेच व्याकरण करावयाचे असावे. पण केवळ लौकिक वाङ्मयाची दुरवस्था त्या काळी कशी होत होती, तेही दृश्य त्याच्यापुढे होते. आपले व्याकरण परंपरेने स्वीकारावे, ते चिरंतन टिकावे अशी महत्त्वाकांक्षाही त्याला होती. त्याने आपल्या इच्छेला मुक्तीची थोडी जोड दिली. वेदांचेही व्याकरण अधूनमधून त्याने विखुरले आणि वैदिक संप्रदायाचे गाडीत जागा मिळवून प्रवास चालू केला व तो यशस्वी झाला. व्यावहारिक समस्येवर व्यावहारिक चतुराईने विजय मिळविला.

सध्या वेदाङ्ग म्हणून मान्यता मिळालेले आणि अध्ययन–अध्यापन–परंपरेत असलेले जे ग्रंथ आहेत, त्यांपैकी कल्प (श्रौतसूत्रे), निरुक्त वेदाङ्ग–ज्योतिष हे तीन केवळ वेदाशीच संबद्ध आहेत. पण राहिलेले म्हणजे शिक्षा, व्याकरण, छंदःशास्त्र ह्या तीन अंगांचे सध्याचे मान्य ग्रंथ वरील तीनपेक्षा वेगळ्या स्वरूपाचे आहेत. त्यामुळे वेदाङ्ग म्हणून अगदी प्रथम उल्लेख अगर अध्ययन–अध्यायन– परंपरा जेव्हा सुरू झाली, त्यावेळी हे ग्रंथ वेगळे असावे, त्यांचे स्वरूप इतर तीन वेदांगांसारखे केवळ वेदसंबद्ध अगर निदान बहुतांश भाग तरी वेदसंबद्ध असावा. पण त्यांची एकूण गुणवत्ता अगदी नरम असावी, नंतर कालांतराने विशेष गुणवत्तेचे सध्याचे ग्रंथ उपलब्ध झाल्यावर ते पूर्वग्रंथ क्रमाक्रमाने परंपरेतून बाजूला पडलें असावे आणि काही शतकांनंतर पूर्ण दुर्मिळ झाले असावे. नवीन ग्रंथांचा प्रत्यक्ष वेदांशी संबंध थोडा आणि आणि तोही ढोबळ, तथापि शास्त्रीय गुणवत्ता आणि व्यावहारिक विशेष उपयुक्तता ह्यांच्या जोरावर परंपरेत ते पाय रोवून कायमचे बसले.

हजारो वर्षांच्या वैदिक वाङ्मयाच्या पाठांतराच्या ओझ्याने परंपरा अगदी भारावली होती. अत्यंत संक्षिप्त आणि विशेष शास्त्रीय गुणवत्ता असलेले अंशतः वेद-संबद्ध आणि बव्हंशी प्रचलित भाषासंबद्ध असे व्याकरण तयार केले, तर परंपरेत त्याला स्थान मिळेल, हा पाणिनीचा आडाखा. संक्षेपासाठी त्याने अनुबंध, प्रत्याहार अनुवृत्ती, परिभाषा, असिद्धत्व, परबलीयस्त्व वगैरे अनेक उपाय योजले. त्यामुळे व्याकरणाची एक आगळी भाषाच तयार झाली. पाणिनीची अनेक सूत्रे संस्कृतमध्ये आहेत, हे विधान खचितच धाडसाचे ठरेल. खरे तर ती कोणत्याच रूढ भाषेत

नाहीत, तर व्याकरणाच्या स्वतंत्र भाषेत आहेत, हेच म्हणणे वास्तवाचे होईल. सूत्र म्हणजे काही विधान करणारे एक अगदी सुटसुटीत वाक्य. कोणत्याही वाक्यात निदान उद्देश्य आणि विधेय असे दोन शब्द तरी अत्यावश्यक. पण 'चौ, शे, टेः श्लौ' अशी कित्येक एकाक्षरी सूत्रे तर 'नामि, झयः, कितः, चङि, इत्यादी दोन अक्षरी पण एकच शब्द असलेली अनेक सूत्रे आहेत त्या सूत्रांचा अर्थ पाणिनीचे तंत्र समजून घेतले, तर अगदी स्पष्ट. पण ते तन्त्र न जाणता कोशादांची कितीही मदत घेतली, तरी ती मुकीच राहतात. व्याकरणाची स्वतंत्र भाषा ही पाणिनीची व्याकरण-परंपरेला मिळालेली भली देणगी आहे. व्याकरणशास्त्रीय गुणवत्तेइतकेच त्याचे आगळे तंत्रही त्याच्या परंपरामान्यतेला आणि चिरंजीवित्वाला महत्त्वाचे कारण झालेले आहे.

पाणिनीच्या पुढे असलेल्या शास्त्रीय आणि व्यावहारिक समस्या आणि त्याबाबत त्याने योजलेले उपाय ह्यासंबंधी उल्लेख खुद्द अष्टाध्यायीत नाहीत. कारण त्याला अभिप्रेत व्याकरणाच्या दृष्टीने त्या अगदीच फालतू, म्हणून व्याकरणाचे अंतरंगांत स्थान कधीच मिळणे शक्य नाही. त्यामुळे संक्षेपाला जिवापाड जपणाऱ्या पाणिनीने त्यांचा उल्लेखही केलेला नाही. तथापि टीका व त्याकाळच्या इतर वाङ्मयावरून अंदाजलेली परिस्थिती यांचा मागोवा घेता जे वाटते, ते संक्षेपाने मांडलेले आहे. मराठी अगर अन्य कोणत्याही भाषेच्या व्याकरणकारांनी शब्दापेक्षा त्याच्या तात्त्विक भूमिकेचा ठाव घ्यावा. बाह्य अनुकरणापेक्षा तात्त्विक बैठक विचारपूर्वक अनुसरावी, हाच या विवेचनाचा उद्देश आहे.

**भांडारकर प्राच्यविद्यासंशोधनमंदिर, पुणे ४११००४**

# भाषणशैली आणि नाट्यात्म शक्यता

अशोक दा. रानडे

गद्यशैली

आशयाचे संघटन आणि आवाजाचे उत्पादन ध्यानात घेता गद्यशैलीचे पुढील विशेष अर्थपूर्ण ठरतात :

सार्थ, सहेतुक, कालनियत, एकसुरी, समानगती आणि कमीत कमी आघातयुक्त.

रंगमंचन करणे अवघड जाईल व केवळ अशी माहिती म्हणून उपयुक्त बाब श्रोते–प्रेक्षकांपर्यंत पोचविण्याचे कार्य गद्यशैलीचे असते. अधिक नाट्यात्म भागांना पार्श्वभूमी पुरविण्याचे कामही प्रस्तुत शैलीने साधते. अशा गद्यांना उद्देशून प्रसिद्ध कवी येट्सने 'अस्मृत पुष्पे' अशी चित्रमयी संज्ञा वापरली आहे.

एकसुरी गद्याचे दोन काहीसे परस्परविरोधी उपयोग नोंदण्यात आले आहेत. उदाहरणार्थ :

'खुशमस्कऱ्यांच्या सोंगात कोठेही प्रमाणाबाहेर अभिनय न करता प्रेक्षकांना ताब्यात कसे ठेवायचे, हे मी या भूमिकेत ('विचित्रलीले'तील विचित्राच्या) भूमिकेत शिकलो...थंडपणे, चेहऱ्यावरील हावभाव न दाखवता वाक्ये बोलून कित्येकदा खूप परिणाम साधत असे.'

'सबंध कीचकाची भूमिका एका आवाजात आणि एका पवित्र्यात बसविली आहे. भागवत ती करीत असत. एका आवाजात व एका पावित्र्यात. ताठ उभे राहणे, केव्हाही न वाकणे...हे कीचकाचे गुणविशेष असल्याने सगळी भूमिका एका आवाजात व एका पवित्र्यात करून ती परिणामकारक करता येत असे.'[२]

भावनिक दृष्ट्या विविधरंगी नसतानाही गद्यशैलीची नाट्यात्म उपयुक्तता कोणत्या प्रकारची असू शकते, याचा वरील उदाहरणांवरून बोध व्हावा.

**साहित्यिक शैली**

प्रस्तुत शैलीचे पुढील विशेष नोंदण्यात आले आहेत : लिखित अवताराला महत्त्व-विद्वज्जडच्या प्रतीतीचा धोका पत्करूनही संस्कृत शब्दांवर भर देणे, व्याकरणशुद्धतेला पात्रापात्रतेचा निकष मानणे, मर्यादित तारताभेद, अनियमित आघात आणि अनियत गती.

नाट्यात्म परिणामाचा विचार करता साहित्यिक शैली मुख्यत: ऐकणारांचे कान

' दिपविते ', असे म्हटले पाहिजे. दैनंदिन जीवनात भाषा सैलपणे वापरली जात असते, इतकेच नव्हे, तर जे म्हणावयाचे असते, त्याच्या आसपास भाषा वावरते, असेही वाटत राहते. शिवाय अनेकदा वाक्ये, शब्द, अर्धोच्चारित सोडण्याचाही प्रकार होतच असतो. साहित्यिक शैलीचे पूर्णपण, नेमकेपण यांमुळेच आधी ऐक. णारा / वाचणारा गारद होत असतो. ज्या आविष्कारप्रभुत्वाचा आपल्याला कधी कधी प्रत्यय असतो, त्याचा अखंड उपयोग साहित्यिक शैलीतून अनुभवास येतो.

दुसरे म्हणजे साहित्यिक शैली शब्दकेंद्रित असल्याकारणाने ' शब्द ' हाच स्वतः-कडे लक्ष खेचून घेऊ लागतो. उपमा, उत्प्रेक्षा, श्लेषादींचा आढळ विपुल राहतो. शब्दाच्या न्यायाकृतीकडेही दुर्लक्ष होत नाही आणि प्रासानुप्रास, यमकादी गर्दी करतात. (अनेकदा त्यांची भाऊगर्दी होते). नादवर्षावाने कान भरत आहेत; पण नाटच तिष्ठले आहे, असेही चित्र विरळा नाही ! सर्वसाधारण विवेचक शक्तींना प्रस्तुत शैली बोथट करते. ब्रेख्ट ज्याला बालिश (नाईव) रंगभूमी म्हणतो, तशी अस्तित्वात येते. सगळे काही स्वीकारले जाते. अभिनय साचेबंद होतो, हालचाली यांत्रिक बनतात, भाषणे टाळ्या मिळवण्याची संधी म्हणून ' ठोकली ' जातात. केशवराव दात्यांना गडकऱ्यांच्या नाटकांनी नाव मिळवून दिले असले, तरी महा-राष्ट्राच्या मार्लोला त्यांनी नीटपणे तोलले होते, असे दिसते.

' (गडकऱ्यांच्या नाटकांना)...सामान्य नटही चालतो. शब्दसामर्थ्य एवढे मोठे, की कोणी कसेही बोलला, तरी तो चांगलाच वाटेल. पण सूक्ष्म भेदग्राही नटाला गडकऱ्यांच्या नाटकात समाधान लाभणार नाही...त्याचे भाषावैभव, कल्पनारम्यत्व एवढे मोठे, की त्यापुढे साऱ्या गोष्टी वाहून जातात, प्रेक्षक व नट त्याने पूर्णपणे वाहून जातात. ' ३

परंतु साहित्यिक शैलीचा अधिक घातक म्हणता येईल, असा विशेष म्हणजे तीमुळे नाट्यप्रयोगच अनावश्यक वाटू लागतो !

' गडकऱ्यांची वाक्ये आपल्याशीच मोठ्याने म्हणा किंवा वाचा, त्यातून तुम्हांला आनंद मिळेल. त्याला नाटकच कशाला हवे ? ' ४

प्रस्तुत शैलीस अभिनेत्यापेक्षा/ऐवजी पाठक पुरतात ! अभिनयास प्रस्तुत शैली वाव ठेवीत नाही. इतकेच नाही, तर अभिनयाच्या न्याय्यतेस छेद देते. कारण तीत अभिनयगर्भ शब्द नसतात. नैसर्गिक अभिनयाची साहित्यिक शैलीच्या संदर्भात कल्पना करणे हेच अयोग्य ठरते. मुरलेल्या नटाला म्हणूनच प्रस्तुत शैली आणि तिच्यावर भिस्त ठेवणारी नाटके नकोशी वाटतात. दिवाकरलिखित एकांकी दुःखा-त्मिकेतील वास्तवदर्शी, कारुण्यगर्भ व अभिनयास वाव ठेवणाऱ्या भाषेच्या संदर्भात दाते नोंदतात.

' बेबंदशाही पूर्वी कारकून नाटिका बसविली. तेव्हा मी स्वतः भयंकर खूश

होतो. तेव्हापासून अभिनयाच्या बाबतीत वाटू लागले, की आपल्याला भाषणे जितकी कमी, तितकी चांगली. '[५]

विरुद्ध टोकाच्या म्हणजे नाटककाराकडचा पुरावाही पाहण्यासारखा आहे. नाटककार कारखानीस म्हणत, 'खरा नट हा लेखकाला फार थोडे लिहायला लावतो. '[६]

साहित्यिक शैली व तीत लिहिलेले नाटक समोर आल्यास अभिनेता दोनच गोष्टी करू शकतो. शरण जाणे वा संहितेत बदल करणे; प्रस्तुत शैलीवर पोसलेल्या श्रोते-प्रेक्षकांवर दुसरे काहीही बिंबवणे किती अवघड, याची कल्पनाच न केलेली बरी! अशा शैलीत गुंतलेला श्रोता आणि प्रेक्षक-दोघांचेही स्वातंत्र्य पूर्णतः हिरावून घेतले जाते, हे निःसंशय.

अर्थात याचा अर्थ असा नाही, की नाटयव्यवहारात साहित्यिक शैलीला स्थान नाही. उदाहरणार्थ, नाटयात कृत्रिमतेला जागा आहे आणि साहित्यिक शैली कृत्रिमता प्रभावीपणे व्यक्त करते. क्षुल्लक बाब वा घटना प्रस्तुत शैलीने वर्णिल्यास निर्माण होणारा विनोद सहजगम्य असतो.

अनेक वेळा संघर्षाचे चित्रणही साहित्यिक शैलीद्वारा चमकदार करता येते. ज्या संघर्षशील घटकाचा वरचश्मा दाखवायचा असेल, त्याला साहित्यिक शैली देऊ करण्यात नाटककाराचा फायदा होतो. सत्ता सिद्ध होते. राजे–रजवाडे, न्यायाधीश, धनसंपन्न यांच्या मुखी साहित्यिक भाषा केवळ योगायोगाने येत नाही.

साहित्यिक शैलीद्वारा सत्ता व तिचे अधिष्ठान सिद्ध करू पाहण्यात लिखित परंपरेविषयीचा आपला आदर व शरणागतभाव सिद्ध होतो. साहित्यिक शैली परंपरेने चालत आलेल्या लिखित शब्दाधारित कृतींमुळे तयार होत असते. अवतरण, सूचन, इ. द्वारा साहित्यिक शैली अशा संपूर्ण परंपरेवर दावा सांगते. प्रत्यक्षतः उच्चारल्या जाणाऱ्या शब्दाला, विधानाला, इ. परंपरेच्या पुण्याईने वेगळीच धार चढते. भाषेची आर्तता, विद्वज्जडता, इ. सर्वांमुळे यात भरच पडते.

एक उपसिद्धांत इथे नोंदला पाहिजे. साहित्यिक ऐट हा केवळ संस्कृत शब्दांचा मक्ता असे समजण्याचे कारण नाही. एकंदरीने मराठी नाटकात इंग्रजी, एकंदरीनें बोलीभाषेत रचलेल्या नाटकात शहरी इत्यादींमुळे समान परिणाम साधता येतो. दैनंदिन जीवनातील आपला अनुभव असेच दर्शवीत नाही काय? एतद्देशीय नसलेल्या भाषेचा वापर करून संघर्ष परिस्थितीत आपला वरचश्मा सिद्ध करण्याचा प्रयत्न नेहमीच केला जातो. सत्ताधारी गटाची वा सांस्कृतिकदृष्टया वरच्या थरावर आहेत, अशांची भाषा वापरणे म्हणजे त्यांच्या बळाच्या पाठिंब्याची इच्छा व्यक्त करणे! भांडणासाठी हिंदी वा इंग्रजी वापरण्याचा प्रघात जवळजवळ सर्रास झाला आहे. एकंदर प्रकार शैलीगत बाबींच्या ऱ्याच पलीकडे पोचतो, हे उघड आहे.

**पद्यशैली**

भाषिक मोडणीचा विचार करताना पद्यशैलीचा विचार साहित्यिक शैलीआधी केला होता. नाट्यात्म शक्यतांच्या विचारात मात्र हा क्रम बदलला आहे. कारण असे, की कालिकतेपासून छंदोबद्धतेकडे जाताना साहित्यिक शैलीचा टप्पा मध्ये लागतो. कोणीतरी म्हणाल्याप्रमाणे गद्यावर अतिशयोक्ती लादली आणि छंदोबद्धतेत अपभ्रंश येऊ दिला, की अलंकारिकता तयार होते ! असो. काही प्रमाणात साहित्यिक शैली पद्यशैलीकडे तात्पुरती व योगायोगाने म्हणण्यासारखी पावले टाकते, साहित्यिक शैली पद्यशैलींच्या अलीकडे थांबते. तर काव्यात्म शैलीची प्रवृत्ती तिला ओलांडवयाची असते.

पद्यशैलीचे महत्त्वाचे विशेष पुढीलप्रमाणे नोंदता येतील :

(१) कालनियततेचा दबाव

(२) कालावर्तनाची नियमितता

(३) स्वरूपसिद्धीसाठी प्रयोगावर भिस्त

(४) पठनपरंपरेशी इमान

(५) सहजगम्य तारताभेद, निश्चित आघात आणि नियंत्रित गती.

नाट्यात्मतेच्या दृष्टीने विचार करता पद्यशैलीचे काही खास गुण आहेत.

पहिले असे, की तीमुळे माहिती इ. संक्षेपाने सांगता येते. गद्यात सांगितली असता पसरट वाटणारी व नाट्यात्म तणावांना सैल करणारी माहिती पद्यातून भरवली असता खटकत नाही. किर्लोस्कर आणि देवलयुगात साकी, दिंडी, कटाव, इत्यादी साच्यांचा परिणामकारक उपयोग केला. हे आठवण्यासारखे आहे. श्रोते-प्रेक्षकांचे ध्यान खेचून घेणे प्रयोगकलांचे प्रधान लक्ष्य असते. पद्यामुळे दुसरा फायदा होतो, तो हा. नियमित आघातपूर्णतेखेरीज बहुतेक छंदांना निश्चित चढ-उतार असतात. इतकेच नव्हे, तर त्या चढ-उतारांना सुरावट वा चाल म्हणता येईल, अशी आकृती असते. परिणामतः पद्याच्या साच्याद्वारा नाट्याच्या ताण्याबाण्यात संगीताचा धागा मिसळला जातो. संगीत नाटकात इतरत्र अधिक संगीतमय भाग असतात. त्यांना या चाली उठाव देतात, संगीत तीव्रपणे, परिणामकारकतेने जाणवावयाचे, तर सांगीतिकेतेच्या विविध पातळ्या असाव्या लागतात. चाल असो वा नसो पद्यात्मक रचनांमुळे हे कार्य साधते. यात शंका नाही.

पद्यामुळे पार पाडता येणारी आणखी एक जबाबदारी म्हणजे स्मरणशक्तीच्या खोलवरच्या थरावर पोचता येणे होय. एक कमी अवधीची आणि एक दीर्घ कालावधीची अशी दोन प्रकारची स्मरणशक्ती असते. यमके, प्रासानुप्रास वगैरेंमुळे पहिल्या स्मरणशक्तीस मदत होते. नाट्याचा उत्कर्षबिंदू वा निष्कर्षबिंदू पद्यात्मक असल्यास मनात रेंगाळतो. घोषणा, प्रतिज्ञा, शपथ, इत्यादींसाठी पद्य वापरण्याची प्रथा इथे

ध्यानात यावी. प्रवेशांती शेक्सपीयरलाही पद्यात्मक ओवींची जोडी टाकावीशी वाटे. निरनिराळ्या घटना वा त्यांचे आशय श्रोते-प्रेक्षकांच्या मनांवर ठसे उमटविण्यास समर्थ राहावेत, अशी नाटककारांची धडपड असते. पद्यशैली इथे सहायक ठरते.

रेमंड विल्यम्ज् आदींनी पद्यशैलीविषयक आणि एक महत्त्वाचा मुद्दा पुढे आणला आहे.[७] त्यांचे म्हणणे असे, की पद्यामुळे केवळ भाषणशैलीविषयी वा शारीर हालचालींविषयी सूचना मिळते, असे नसून संबंधित नाट्यप्रवेशाची एकंदर गती काय याविषयी पद्यभागामुळे मार्गदर्शन होत असते. अंकामधील भावनिक वळणे दाखविण्यासाठी पद्याचा वावर होत असतो, असे त्यांचे शेक्सपीअरच्या संदर्भातले विवरण आहे. ऑपेरातील अभिनेत्यांना उद्देशून स्टॅनिस्लाव्स्कीने एक मुद्दा मांडला, तो इथे सयुक्तिक आहे. गद्य-अभिनेत्यांपेक्षा संगीतिकेतले अभिनेते नशीबवान. कारण हालचाल, हावभाव यांकरिता एक तयार चौकट त्यांना संगीतामुळे लाभते, असे तो म्हणे.[८] प्रस्तुत विवरण पद्यशैलीसही लागू पडते. स्टायन म्हणतो, त्याप्रमाणे अप्रतिरूपात्म नाट्यात अशी चौकट लाभणे फारच उपयुक्त असते. कारण तरल नाट्यात हालचाल आणि घडामोड यासाठी इतर ठळक आधार नसतात.[९]

एका निराळ्या संदर्भात गिलगुड या प्रख्यात नटाने म्हटल्याप्रमाणे जिवंत रंगभूमीवर भाषण व निःशब्दता हे दोन सर्वांत प्रभावी विशेष होत.[१०] विरामस्थाने निःशब्दतेच्या तत्त्वाचे प्रतिनिधित्व करतात. विविध मूल्यांचे आणि विविध स्थानी येणारे विराम पद्यात गुंफलेले असतात. पद्याच्या बांधणीचा भाग म्हणून विराम कार्यकारी होत असतात. पर्यायाने भाषणगतीचे नियंत्रणही अवतरते. वरवर पाहता केवळ भाषिक वाटणारा एक विशेष नाटकाच्या संपूर्ण गतिमानतेशी जाऊन भिडलेल्या आढळतो. सार्थ विरामस्थाने संवादाच्या तोडीची ठरतात. विरामस्थानांचे महत्त्व प्राथमिक दर्जाच्या रंगभूमीतही उमजलेले असते. पु. ग. काणेकरांनी वर्णिल्याप्रमाणे अर्वाचीन काळाच्या आरंभी दशवतारी वा भावेयुगातील रंगभूमीवर पाय आपटून विरामस्थानें स्पष्ट करणारी राक्षसपात्रे ध्यान आकर्षून घेत.[११] श्रोत्यांना आघात कळावेत, हाच हेतू असे. काहीसा ढोबळ वाटणारा हा आविष्कार राक्षसपात्रांच्या संदर्भात नैसर्गिक अभिनय ठरत असणार !

प्रस्तुत चर्चा फक्त छंदोबद्ध पद्याच्या संदर्भात लागू आहे, असे नाही. मुक्तछंदाबाबतही ती सयुक्तिक आहे. एलियट इत्यादींनी दर्शविल्याप्रमाणे मुक्तछंद नेहमी छंदाची सूचना देत राहतो. तीत छंद गुप्त असतो, म्हणावे, हवे तर. शिवाय ओळींचा भंग होणे वर्गरेंतून लवचीकपणा प्रत्ययास येतो. नाट्यात्मतेच्या शक्यता वाढतात. कारण गद्य वा पद्याच्या विश्वातले चांगले भाग वाट्याला येतात. गद्याची शुष्कता वा पद्याची यांत्रिकता. दोहोंवर मात करता येते. प्रयोगात पद्य किती निरनिराळ्या पद्धतींनी वापरता येते, याचे एक उदाहरण विल्यम पोएलसारख्याचे यत्न होत. त्याचे

'टच्यून्ड् टोन्स्' गद्यपद्यांच्या अंगभूत गैरफायद्यांना शह देण्यासाठी योजले होते.

पद्यशैलीबाबत खास करून जाणवणारी अडचण अशी, की तिचे ग्रहण व तीमधील गर्भित संगीतात्मतेचे बोधन विशिष्ट संस्कृतीत, विशिष्ट काळी रूढ नाटचबाह्य पद्यावर अवलंबून असते. शेक्सपीअरचा श्रोता एलिझाबेदकालीन पद्यपरंपरेशी परिचित होता. म्हणून त्याला शेक्सपीअरचे पद्य 'घेता' येत होते, असा योग्य मुद्दा निमोलने मांडला आहे.[१२] श्रोत्याचे कान तयार असले, की मार्गांतर, प्रयोग नवीन जुनेपण, कसब–कामगिरी वगैरेंना दाद मिळते व नाटककारांनीही संबंधित माध्यम प्रभावी वाटू लागते. नाटचबाह्य पद्यामुळे नाटचात्म पद्य उठून दिसण्याची जेस्टाल्ट घटना प्रभावी होते.

**बोलीभाषा**

बोलीभाषेचे पुढील विशेष ध्यानात घेण्यासारखे आहेत :

(१) बोलीभाषा वर्तमानकाळी रूढ असते.

(२) संस्कृतिगटांतील बहुसंख्यांना उच्चारसौकर्य जाणवण हा तिचा गुण होय.

(३) ती जास्तीत जास्त प्रमाणात प्रयोगशरण असते.

(४) अभिनयगर्भ वा 'स्पोकन ॲक्शन' शब्दांनी ती संपृक्त असते.

(५) आघात, चढ-उतार व उच्चार लांबविणे, इ. प्रकार तीत भरपूर आढळतात.

बोलीभाषेच्या नाटचात्मतेची चर्चा करताना एक बाब स्पष्टपणे ध्यानात ठेवली पाहिजे. मागासलेल्या प्रादेशिक बोली म्हणजे बोलीभाषा असे अभिप्रेत नाही. उच्चार-सुलभता एतद्देशीय नसलेल्या भाषांचे प्रभाव, संपर्कमाध्यमे वगैरेंमुळे प्रचारात येणाऱ्या भाषिक 'फॅशन्स्' इत्यादींमुळे लिखितापेक्षा निराळी म्हणून अवतरणारी ती बोलीभाषा होय.

अभिनयगर्भ शब्द नाटचात्मतेच्या खुणा ठराव्यात, याचे नवल नाही. त्याचे जीवनसंदर्भ व्यापक असतात आणि उच्चार, मुद्रा, हावभाव व हालचाल, इत्यादी आविष्कारमार्गांना त्यात वाव असतो. एकाच संस्कृतिगटाच्या घटकांना बोलीभाषा वारसा म्हणून लाभत असते. तीमधले शब्द वेगळया तऱ्हेने सादर केले, तर इष्ट परिणाम साधत नाही. इतकेच नाही, तर हसे होऊ शकते. निश्चित अपेक्षा निर्माण करणाऱ्या बोलीभाषेचा अपेक्षित न प्रयोग झाल्यास तणाव निर्माण होतात. सामाजिक एकात्मतेच्या परिणामास तडा जातो, श्रोते, प्रेक्षकांशी सूत जुळवायचे, तर बोलीभाषेचा आधार सहज घेता येईल. पण तिच्या शर्ती मान्य केल्या, तर !

**काव्यात्म शैली**

काव्यात्मशैलीचे मुख्य विशेष पुढीलप्रमाणे :

(१) सर्वसाधारणतः ती सूचक आणि सारग्राही असते.

(२) सार्थ, सहेतुक व कालिक पण सर्वत्र लवचीकपणाचा आढळ होतो.
(३) प्रयोगाशी जवळीक पण कार्यबद्ध नाही.
(४) शैलीसांकेतिकतेचे प्रमाण बरेच.
(५) तारताभेद बरेच. पण अनिश्चित मूल्याचे, अघात व ध्वनिवैशिष्ट्य यात विविधता.

अर्थाचे व छंदोबद्धतेचे सूचन करणारी काव्यात्मशैली एक सर्वसाधारण मोहरा घेते. पण निश्चित विधान करीत नाही. परिणामतः कल्पना प्रतिमासृष्टी, शब्दकळा या सर्वांची प्रवृत्ती विशिष्ट व्यक्ती, घटना, कालखंड वगैरेंशी जखडून न राहण्याची असते. धाव अमूर्ताकडे राहते. नाटयात्मतेच्या अंगाने पाहता भावावस्था (भावुकता नव्हे) निर्माण करण्याकडे शैली झुकते. निष्कर्ष वा निर्णय नोंदण्याकडे तिचा कल नसतो. आवाहन करावे, विधान नव्हे, अशी प्रतिज्ञा करून काव्यात्म शैली समग्र अनुभव तरलतेच्या पातळीवर नेऊ पाहते. या पातळीवर प्रत्यक्ष व्यक्ती घटना, इत्यादी निमित्तमात्र ठरतात.

तीव्र भावावस्था अमूर्ततेकडे नेते आणि अमूर्ततेमुळे जागविल्या जाणाऱ्या कल्पना साहचर्याची मर्यादा मोठी राहते. प्रक्षेपित अनुभवाच्या सर्वसाधारण भावाशी सुसंगत अशा व्यक्तिगत भावनांचे जागरण होत असता श्रोता-प्रेक्षक अंतर्मुख बनल्यास नवल नाही. कोणत्याही प्रश्नास दोनच बाजू असतात, असे निःशंकपणे सांगणारी व्यावहारिक बुद्धी किती संकुचित आहे, याचे भान काव्यात्म शैलीमुळे येऊ शकते. तिला चांगले–वाईट, बरोबर–चूक, खरे–खोटे वा सुंदर–कुरूप, इत्यादी द्वंद्वे मान्य होत नाहीत. भावना, विचार घटना वा व्यक्ती वरील जोडयांपैकी कशाच्या तरी एकाच्या छावणीत बसतात. यावर काव्याला शैलीचा विश्वास नसतो. ती सारतः संदिग्ध असते आणि जीवन संदिग्ध असते. याकडे ती आपले ध्यान खेचू पाहते. अनेक स्वगते गद्यशैलीत सुरू होऊन केव्हा काव्यात्मतेत शिरली, याचा पत्ता लागत नाही, हे अर्थपूर्ण म्हटले पाहिजे.

नाटककाराच्या कुवतीनुसार पाहता काव्यात्मशैली फायद्याची वा धोक्याची ठरते.

विविध भाषणशैलींच्या नाटयात्मतेच्या विवरणास पायाभूत चार इशारे नोंदवून प्रस्तुत ऊहापोह थांबविता येईल :

(१) भाषणशैलींमध्ये श्रेष्ठ कनिष्ठत्व नाही. नाटयात्मतेच्या गरजा विविध असतात आणि त्याप्रमाणे शैली प्रस्तुत ठरतात.

(२) भाषणशैलींमधे सरमिसळपणा आढळतो. पण तरीही विशिष्ट आविष्कारात विशिष्ट शैली प्रबळ असते.

(३) प्रतिमाष्सृटी, अलंकार वगैरेंचे विवेचन इथे केले नाही. कारण भाषेची

मूलभूत मोडणी आणि तिच्याबरोबर येणारी आवाजाची फेक, इत्यादी अंगे मुख्यतः भाषणव्यापाराचे रूप निश्चित करतात.

(४) अनेकदा भाषणशैली एकमेकींचे विशेष घेऊन वावरताना दिसतात. कारण मानवी मनाचे व्यवहार पाऱ्याच्या तरलतेने आविष्कार-मार्गातून फिरत असतात.

**संदर्भ**


१. वि. वा. जोग (संपा.), **केशवराव दाते**, मुंबई : परचुरे प्रकाशन १९७६, पृ. २९.

२. पु. रा. लेले, **नाटककार खाडिलकर**, पुणे : जोशी आणि लोखंडे, १९६४, पृ. ९८.

३. वि. वा. जोग (संपा.), **केशवराव दाते**, पृ. ११०.

४. उपरिनिर्दिष्ट, पृ. ३१.

५. उपरिनिर्दिष्ट, पृ. ४२.

६. उपरिनिर्दिष्ट, पृ. ४५५.

7. Raymond Williams, Drama in performance, Penguin Books, 1972, p. 69.

8. David Magarshak, Stanilavsky on the art of stage, London: Faber and Faber 1937, p. 77.

9. J. L. Styan, Elements of drama, Cambridge, p. 30

10. John Gielgud, Stage directions, London : Mercury Books 1963, p. 14.

११. पु. ग. काणेकर, **माझ्या काही नाट्यस्मृती** मुंबई : रा. का. तटणीस, १९४४, पृ. ७.

12. Allardyce Nicoll, The Theatre and dramatic theory, London Harrap, 1962, p. 164.



**संशोधन व तौलनिक संगीतशास्त्र विभाग, नॅशनल सेंटर फॉर द परफॉर्मिंग आर्ट्स्, नरिमन पॉइंट, मुंबई ४०००२१.**

# कुणी तरी म्हणजे कोण ?

## कुर्ट कूझेनबर्ग

सकाळी साडेदहाच्या सुमारास श्रीयुत बोरास आपल्या घराच्या वरच्या मजल्या-वरून खाली येत होते. तेव्हा जिन्यात त्यांना वाटलं, की अगदी पिसासारखे हलके झालो आहोत. आणि त्यांना एकदम हसण्याची अनावर उबळ आली. आदल्या दिवशी संध्याकाळी ते एका मित्राबरोबर खूप प्यायले होते. आधी वाईन, नंतर ब्रँडी, त्यावर बिअर, आणि नंतर सगळ्याची मिसळ ! ते जरा जास्तीच झालं होतं. घरी येताना तर त्यांना विचारच करता येत नव्हता आणि त्यांची गरजच काय होती ? त्यांना घर सापडलं होतं, हे नक्कीच. मग झालं तर ! ते उशिरा उठले होते. आणि आता खाली जेवणघरात न्याहारी त्यांची वाट बघत होती. सकाळची न्याहारी, की दुपारची ? ही न्याहारी त्यांची वाट बघत होती, की ते तिची ? कदाचित दोघं एकमेकांवर दबा धरून बसले असतील. त्या कावेबाज न्याहारीचा फडशा पाडण्याच्या कल्पनेनं बोरास उल्हसित झाले. आणि त्यांना एखाद्या फवाऱ्यासारखं खदखदून हसू आलं. आजच्या दिवसातलं हे त्यांचं शेवटचंच हसू होतं.

खाली आल्यावर बोरासना वाटलं, जरा बागेत नजर टाकून यावं. स्वैंपाकघरातून बायकोची खुडबुड ऐकू येत होती. तरी त्यांना त्या बाजूला जावंसं वाटलं नाही. त्यांच्या मनात आलं, लवकर उठणाऱ्या माणसांना स्वतःचंच फार कौतुक असतं. इतर उशिरा उठणाऱ्यांना मात्र ते फारच फणकाऱ्याने वागवतात. त्यांना दुखावतात, किंवा त्यांच्याशी कुत्सितपणे वागतात. एखाद्या बागेचं मात्र अगदी याउलट असतं. बाग म्हणजे निव्वळ चांगुलपणाचं प्रतीकच. ती कोणाकडे टोकून बघत नाही, तर लोकच तिच्याकडे बघतात. ती आपली तिथे असते, नुसती असते– हिरवीगार. हा हिरवेपणा माणसाला हवा असतो. कारण तो त्याला तजेला देतो. काहीही हिरवंगार बघणं हेही हिरवं काही खाण्याइतकंच पोषक असतं.

श्रीयुत बोरास बागेत जरा फिरले. ते हिमबेरीच्या झुडपाशी आले, तेव्हा त्यांचं त्यांच्या कुत्र्याकडे लक्ष गेलं. तो जोरजोरात जमीन उकरत होता. त्यांनी त्याला शीळ घातली. ते कुत्रं एकदम थांबलं, त्यानं वर बघितलं आणि ते धावत त्यांच्या दिशेला आलं. पण आपल्या मालकाच्या अंगावर प्रेमानं उड्या मारण्याऐवजी ते धमकावत. त्यांच्या भोवती गोल गोल फिरू लागलं–गुरकावत आणि भुंकत.

हा माझ्यावर नाराज आहे, श्रीयुत बोरासना वाटलं. माझ्या रंध्रांतून बाहेर

पडणाऱ्या बाष्पातून त्याला दारूचा वास येत असेल. "ये, इकडे ये", आपल्या पायावर हाताने थोपटत, ते त्याला चुचकारत म्हणाले. पण त्या कुत्र्याला मात्र हे आव्हानच वाटलं. त्याने एकदम त्यांच्यावर झडप घेतली. श्रीयुत बोरासनी त्याला फटकावलं, तेव्हा तो त्यांच्या हाताला चक्क चावला. प्रथम ते भयंकर चिडले. नंतर मात्र घाबरले. शेवटी ते कुत्रं भडकलं. तेव्हा मि. बोरास मागे सरकले. त्यांना याबद्दल बायकोशी बोलायचं होतं. कुत्र्यावर नजर ठेवून हळूहळू ते मागे सरकत होते. एखाद्या भोवऱ्यासारखे फिरत ते घराकडे जाऊ लागले.

"तुम्ही आमच्या बागेत काय करताय् ?" मागून ओरडल्याचा आवाज आला- आणि श्री. बोरासनी वळून बघितलं, तर समोर त्यांची बायको ! त्यांनी भानावर येऊन नजर चटकन् परत कुत्र्याकडे वळवली. त्याच्यापासून सावध राहणं त्यांना भाग होतं. तो त्यांना अधिकाधिक दाबत होता.

"मार्था," ते ओरडले, "डोकी फिरली आहेत का तुमची सगळ्यांची !"

"हाक मारा तर खरं पुन्हा मला नावानं, पोलिसलाच बोलावते." ती खरो. खरीच असं बोलली त्यांच्याशी. थोडंसं झिंगल्याबद्दल ती वर्षानुवर्षांचं लग्नाचं बंधन झिडकारू पाहत होती, यावर विश्वास बसणार नाही.

"हे कोण काका आहेत ?" एका लहान मुलाचा आवाज आला. हे मात्र श्रीयुत बोरासना फार लागलं. त्यांचा आपल्या मुलावर फार जीव होता. आणि आता हा मुलगाही बिथरलेला दिसत होता.

"बाहेर व्हा !" बायको कडाडली.

"बाहेर व्हा !" तो मुलगाही ओरडला. संतापलेल्या आईच्या आडोशात त्यालाही जोर चढला. तो कुत्राही भुंकून त्यांना साथ देत होता. ते तिघंही श्रीयुत बोरासच्या अंगावर येऊ लागले. तेव्हा मात्र त्यांनी माघार घेतली. ते एखाद्या चोराप्रमाणे स्वत:चं घर सोडून गेले.

चक्रावलेल्या मन:स्थितीत ते रस्त्यातून चालत होते. पुढच्या वळणावर ते वळले आणि चालत राहिले. पुन्हा एकदा कोपऱ्यावर वळले आणि चालत राहिले. बराच वेळ त्यांचं असंच चाललं होतं. त्यांच्या विचारात काही सुसूत्रता येत नव्हती. एकदम त्यांच्या मनात आलं, आदल्या रात्री नशेत घरी आल्यावर ते विचित्र आणि वाईट वागले असतील. त्याची त्यांच्या बायकोला आणि इतरांना घृणा आली असेल. बहुधा असं काही झालं नसेल. पण काय सांगावं, कदाचित असेलही ! नशेत काहीही शक्य असतं, खरं म्हणजे सगळंच. त्यांना वाटलं, काल मला कदाचित किल्शने घरी सोडलं असेल. त्याला विचारावं. कदाचित त्याला काही जास्त माहीत असेल.

हा मित्र काही फार लांब राहायचा नाही. पाचच मिनिटांत श्रीयुत बोरासनी त्याच्या घरची घंटा वाजवली. किल्शने दार उघडलं, आणि थंडपणे त्यांच्याकडे

बघत विचारलं,

" काय काम आहे आपलं ?"

" किल्श," श्रीयुत बोरास म्हणाले, " हा काय चावटपणा आहे ? "

कुत्सित चेहऱ्यानं तो माणूस म्हणाला,

" तेच मी तुम्हांला विचारतो आहे. " आणि त्यानं खाडकन् दार बंद केलं.

आता हा मित्रसुद्धा त्यांच्याविरुद्ध गेला. असं काय घडलं असेल, की श्रीयुत बोरासना सगळ्यांचे दरवाजे बंद व्हावे ?

'मला तर काहीच लक्षात येत नाहीये. ' श्रीयुत बोरासनी स्वतःशीच कबुली दिली. मला तर माझ्या घरी जाता येणार नाही, निदान आज तर नक्कीच नाही. तिथे तर सगळे फारच चिडले आहेत. मग आजची रात्र कुठे काढावी ?– अरे, हां. कार्लोकडे ! सरळच आहे ! ! तो माझा चांगला मित्र आहे. माझ्या आधीच लक्षात यायला हवं होतं. आम्ही शाळेपासून एकमेकांना ओळखतो. त्यामुळे जवळीक आहे.

कार्लोकडे जायचं, म्हणजे एक छोटा प्रवासच. आणि त्यामुळेच त्याच्याकडे जाणं येणं हळूहळू कमी झालं. पण आज सगळ्या आळसावर मात करून श्रीयुत बोरास अर्धा तास आगगाडीचा प्रवास करून त्याच्याकडे गेले. पायऱ्या चढत असताना ते अडखळले. अपशकुन ! श्रीयुत बोरासच्या मनात आलं. आज मी दिवसभर अडखळतोय्च.

त्यांनी घंटा वाजवली. पावलांचा आवाज जवळ आला. दार उघडलं. दारात वर्गमित्र उभा. " मला काहीही विकत–बिकत घ्यायचं नाही, " तो तुटकपणे म्हणाला, " मी कसलीही ऑर्डर देणार नाही, कशावरही सह्या करणार नाही. माझ्याकडे पैसे नाहीत. या आपण. " दाराचं लॅच खटकन् बंद झालं. पायऱ्या उतरत असताना श्रीयुत बोरासना पुन्हा एकदा भास झाला, की आपण पिसासारखे हलके झालो आहोत आणि हवेत तरंगत आहोत. पुन्हा एकदा त्यांना हसण्याची उबळ आली– पण ही मघापेक्षा वेगळी होती.

ते रस्त्यावर आले– आणि सरतेशेवटी त्यांच्या लक्षात आलं– त्यांना कळलं, की काय झालं असावं. थोडक्यात सांगायचं, तर त्याचं स्वतःशी असलेलं साम्य हरवलं होतं. एखादी ब्रीफकेस हरवावी, तसा त्यांचा भूतकाळ हरवून गेला होता. आता त्यांना स्वतःची ओळख पटवून देणं दुरापास्त झालं होतं. कमाल झाली, श्रीयुत बोरासच्या मनात आलं. खरं तर मी जगतोय्, पण असं वाटतंय्, की जणू मी कधी जगलोच नाहीये, कारण तशा काही खुणाच राहिल्या नाहीयेत्. मला तर माझ्या असण्याची कोण खात्री होती ! छे, ते सगळं काही नक्कीच केवळ कल्पनेतलं नव्हतं. पण मी हे सगळं कसं काय हरवून बसलो ? काही तरी वेडगळ हालचालींमुळे असेल ? बरोबर. असंच झालं असेल. मी या विश्वाच्या यंत्रणेतून घसरून निखळलो





अनुक्रमणिका

असेन आणि आता परत कुठेच नीट चपखल वसत नसेन. माझ्यापेक्षा धूमकेतू वरे ते सुद्धा अधिक नियमानं बांधलेले असतात.

एव्हाना दुपारचा एक वाजला होता. आपण कालचक्रातून फेकले गेलो आहोत, असं जरी बोरासना वाटत असलं, तरी त्यांना आता भूक जाणवू लागली होती. साधारण या सुमारास जेवायची त्यांची सवय होती. म्हणजे त्याच्या सवयींविषयी बोलायचं म्हटलं, तर ही एक म्हणता येईल. चालताना ते आता उपाहारगृह शोधू लागले. खरं तर या भागात एखादं बरं उपाहारगृह असण्याची शक्यता कमीच होती. हे लांबचं उपनगर राहायच्या घरासाठीच वसवलं गेलं होतं.

उदासपणे श्रीयुत बोरास बऱ्याच बागांवरून आणि घरांवरून गेले. जे घर त्यांनी आत्तापर्यंत आपलं मानलं होतं, अगदी हुबेहूब तश्शी दिसणारी काही घरं होती. त्यामुळेच जेव्हा एका बाईने एका घराच्या खिडकीतून त्यांना हाक मारली, तेव्हा त्यांना त्याचं आश्चर्य वाटलं नाही.

" ये बरं आता, सूप केव्हाच टेबलावर आणून ठेवलं आहे. "

फारसा विचार न करता श्रीयुत बोरासनी बागेच्या दाराची कडी काढली आणि ते आत गेले. त्यांना भूक लागली होती. दारातच एका छोटया मुलाने त्यांच्याकडे झेप घेतली. तो म्हणाला,

" बाबा, बाबा, आज धावन केलेत. "

" वा, छान ! " श्रीयुत बोरास म्हणाले. त्यांनी बुटांवरची धूळ झटकली, टोपी खुंटीला लावली, त्या बाईचं पुसटसं चुंबन घेतलं, टेबलाशी बसले आणि त्यांनी चमच्याने सूप घ्यायला सुरुवात केली. जेवण चालू असताना त्यांनी त्या बाईकडे आणि मुलाकडे निरखून बघितलं. पण काळजीपूर्वक. हे त्या दोघांच्या लक्षात येणार नाही, असं. त्या दोघांना तर उघडपणे तो या घरातला कर्ता पुरुष वाटत होता–ती तशी काही वाईट नव्हती. तो मुलगाही त्यांना आवडला. जेवणही छान होतं.

अरे, त्यात काय एवढं ! कुटुंब म्हणजे कुटुंब. आपल्यालाही एक असल्याशी कारण ! ते महत्त्वाचं. नशीबच म्हणायचं, की मला डोक्यावर एक छप्पर मिळालं, या आधी परिस्थिती बिकटच होती. मी तर काही या दोघांना स्वतःहून निवडलं नाही, हे तर खरंच. पण माणूस असं काय स्वतः निवडू शकतो ? जे भाग पडतं. तेच माणूस स्वीकारतो. काही नाही, हा सौदा काही वाईट नाही. यातून काहीतरी बरच घडेल.– काही नाही तर निदान हा एक चांगला बदल होईल.

" असं काय आमच्याकडे टक लावून बघतोय्स ? " त्या बाईंनी विचारलं. " काही बोलायचं– रागवायचं आहे का तुला ?"

श्रीयुत बोरासनी रुमालानं तोंड पुसलं,

" अंहं, उलट आज तर सगळं कस सुरळीत चाललंय्. " अस म्हणून त्यांनी

समोरच्या डिशमधलं एक सफरचंद घेतलं आणि ते ते सोलू लागले. असं तर नसेल, ना की पूर्वी ते नेहमी इथेच राहिलेले असतील आणि तो ' दुसरा, केवळ त्यांच्या कल्पनासृष्टीतला असेल. कुणी सांगावं, ते स्वप्न होतं ', की सत्य होतं ?

घंटा वाजली.

" थांब, बस, मी उघडते," त्या बाई म्हणाल्या आणि उठून बाहेर गेल्या. त्यांनी दार नुसतंच लोटलं, त्यामुळे व्हरांड्यातलं बोलणं त्याला स्पष्ट ऐकू येत होतं.

" कुठे चाललात ? वा, हो, वा ! " बाई करड्या आवाजात म्हणाल्या, " ताबडतोब बाहेर व्हा, नाही तर मी माझ्या नवऱ्याला बोलवीन. "

" तुझं डोकं ठिकाणावर नाहीये. " एक पुरुषी आवाज.

" गंमत पुरे. मला भूक लागली आहे. "

" हे काय अन्नछत्र वाटलं का ? बाहेर व्हा, बघू. चांगला धडा शिकवला पाहिजे. अगंतुगं करतायत्. "

होता होता भांडण वाढलं. पण तो माणूस लवकरच निघून गेला आणि त्याच्या मागे दरवाजा खाडकन् बंद झाला.

लाल चेहऱ्याने, चिडून बाई परत आत आल्या.

" काय हा आगाऊपणा ! आणि तूही आला नाहीस माझ्या बाजूनं. "

" त्या बिचाऱ्याची दया आली मला. " श्रीयुत बोरास म्हणाले, " तो भुकेनं त्रासला होता. केला असेल त्यानं घोटाळा आपल्या आणि त्याच्या घरात. "

" घोटाळा ? " बाई कडाडल्या, " त्याला कुठलं आलंय् कुटुंब आणि घरदार ! "

श्रीयुत बोरास घाईनं उठले.

" हे बघ, म्हणूनच मी त्याला एका दुपारचं जेवण देऊन टाकतो. मी आत्ता आलो. "

ते पळत बाहेर गेले. त्यांनी बागेच्या दारातच त्या माणसाला गाठलं. तो माणूस अगदी वैतागलेला आणि बिचारा दिसत होता. त्याची नजर भकास होती.

" तुम्हांला काय वाटत असेल, याची कल्पना आहे मला. पण मी तुम्हांला मदत करीन. "

त्यांनी लिहायचं पॅड काढलं आणि त्यावर एक ओळ खरडली; ते पान टर्कन् फाडलं आणि त्या माणसाला देत ते म्हणाले,

" हे बघ, उपयोगी पडेल हा पत्ता. तू तिथे जा. पण अगदी लवकर...नाही तर जेवण गार होईल. "

त्या माणसानं ती चिठ्ठी घेतली. पण तो त्यावर काहीच बोलू शकला नाही, तसा त्याचा काही उपयोगही नव्हता. कारण श्रीयुत बोरास घाईघाईने आत निघून गेले होते.

ते घरात आले, तशी त्या बाई म्हणाल्या,

" तू अति चांगुलपणा दाखवतोस. "

श्रीयुत बोरास बसले. त्यांनीं परत सफरचंद हातात घेतलं.

" तसं अजिबात नाही. मी फक्त दूरदृष्टीनं मदत केली. आज जे त्याच्याबाबतीत घडलं. ते उद्या माझ्याबाबतीत घडू शकेल. "

दुसऱ्या दिवशी श्रीयुत बोरास गावात गेले. ते राहत असत, त्या रस्त्यावर ते आले. ते जेव्हा त्यांच्या घरावरून जाऊ लागले, तेव्हा त्यांनी त्यांच्या बायकोला त्या दुसऱ्या माणसाबरोबर बागेत बसलेलं बघितलं. ती विणत होती, तो वर्तमानपत्र वाचत होता. दोघं सुखासमाधानात दिसत होते. मग श्रीयुत बोरासही सुखीसमाधानी झाले.

**मूळ जर्मनवरून अनुवाद : नीति बडवे**

**अनुवादकाचा पत्ता** : **अर्वाचीन युरोपीय भाषा आणि जपानी भाषा विभाग, पुणे विद्यापीठ, रानडे इन्स्टिटयूट परिसर, पुणे ४११ ००४**

**मूळ प्रकाशन** : Kurt Kusenberg, "Wer ist man ?" : लेखकाच्या Gesammelte Erzalungen, Reinbek bei Hamburg : Rowohlt, 1969 मधून (पृ. १६९–७४).

[ **भाषा आणि जीवन**च्या वाचकांना २:४ दिवाळी १९८४ अंकातली पीटर बिक्सेल या दुसऱ्या एका जर्मनभाषक लेखकाची 'टेबल म्हणजे टेबल' ही कथा आणि तिच्यावरचा दीपक घारे यांचा प्रतिसाद (३:१ हिवाळा १९८५) आठवत असेल.

तशीच ही आणखी एक अंतर्मुख करणारी, आपल्या कल्पना आणि विचार यांची फेरतपासणी करायला प्रवृत्त करणारी कूझनबेर्ग (१९०४–१९८३) या पश्चिम जर्मनीमधल्या एका आघाडीच्या कथालेखकाची कथा. त्याने १५० च्यावर कथा लिहिल्या असल्या, तरी त्याने कादंबऱ्या, नभोनाटय, पटकथा, संगीतिका, आणि दृश्यकलासमीक्षा या प्रकारचे लेखनही केले आहे.

महायुद्धामधल्या अनुभवांचा खोल ठसा त्याच्या लेखनावर उमटलेला दिसतो. वास्तव आणि अतिवास्तव यांमधून नागमोडी वळणे घेणारे त्याचे लिखाण विक्षिप्त, क्वचित् ग्रोटेस्क वाटले, तरी बघता बघता ते आपल्याला खोल पाण्यात घेऊन जाते. ]

# कोण

## कुसुमाग्रज

बसलो असता निवांत रात्री
टकटक झाली दारावरती
दार उघडता आत सरकली
कोणी व्यक्ती
बारिकतेने बघता कळले
हुबेहूब ती प्रतिमा माझी
दुसरी होती !
घाबरलो मी, चाचरलो मी
पुसले त्याला–कोण–कशाला
स्मित संभावित करुनि म्हणे तो
पिशाच मी तव !
गतकालाच्या थडग्यामधला
निवास कोंदट असह्य झाला
म्हणून आलो,
मालक जेथे, तिथेच थारा
मिळे अम्हांला.

पिशाच पण ते माझे होते
आपुलकीने स्वागत केले
गप्पा झाल्या
दूरपणाचे अंतर तुटले
आठवणींचे पर्व चाळता
काळिज कढले,
वादवखेडे कधी पेटता
क्रुद्ध शार्दुलासम गुरगुरलो,
प्रेम–द्वेष–हास्यात डुंबता
स्वरही चढले;
अखेर होता पहाट, गेला
एक आमुच्यामधला निघुनी
गेला कोण नि कोण राहिला
हे मज आता–जन्मभराचे–
कोडे पडले

**पूर्वप्रकाशन : वादळवेल** (१९६९) या कवितासंग्रहातून अनुमतिपूर्वक.

**नव्हत्याचा होता**

गोवामुक्तीनंतरच्या दिवसांत झालेली एक गंमत. रस्त्यावरच्या पोर्तुगीज भाषेतल्या पाट्या अजून टिकून होत्या. अशाच एका बाहेरून आलेल्या प्रवाशाला गोव्यात अनेक ठिकाणी Bebidas Geladas ही पाटी दिसली. पोर्तुगीज भाषेत याचा अर्थ 'शीत पेये'. पण या बाहेरच्या माणसाने मात्र समजूत करून घेतली, की बेबीदास घेलादास नावाच्या कुणी सधन गुजरात्याने चालवलेली ही दुकानांची साखळी आहे !

**इंडियन एक्सप्रेस**, १९८७.०५.१४ वरून संकलन





अनुक्रमणिका

# डॉ. तात्याना कातेनिना : एक श्रद्धांजली

इरीना ग्लुश्कोवा

आमच्या देशात भारताविषयी माणसांना वाटणारी जवळीक अनेक शतकांची जुनी आहे. काही लोकांना भारतीय शास्त्रीय संगीत आवडतं, काही लोकांना भारतीय चित्रपट आवडतात, काही माणसं **महाभारत** आणि **रामायण** ही महाकाव्यं आवडीनं वाचतात: तर काहींना वाटतं, की भारत म्हणजे जादूगारांचं एक जग आहे. पण ही जवळीक सार्वत्रिक आहे आणि ही जवळीक हौस म्हणून बाळगणाऱ्या माणसांची संख्या फार मोठी आहे.

याशिवाय सोविएत संघामधे भारताबद्दलच्या विशेष संशोधनांची व्यावसायिक निवड केलेली माणसं सुद्धा आहेत. त्यांची संख्या मात्र तशी फारशी मोठी नाही, त्यांच्यापैकी ज्या लोकांनी महाराष्ट्र आणि मराठीकडे तोंडं वळवलेली आहेत त्यांची तर संख्या खरं म्हणजे दहा ते बारापेक्षा जास्त नाही.

अशाच डॉ. तात्यांना कातेनिना एक होत्या. 'आहे' या क्रियापदाचा भूतकाळ वापरता, चार महिन्यांपूर्वी ज्या वेदनेनं मला दु:ख दिलं, तीच वेदना आज पुन्हा मला व्याकूळ करत आहे. कारण फेब्रुवारीच्या अखेरीस डॉ. तात्याना कातेनिना यांचं आकस्मिक निधन झालं. त्यांना ओळखणाऱ्या सगळ्या लोकांना फार धक्का बसला. कोणालाही अश्रूंना आवर घालता आला नाही.

डॉ. तात्याना कातेनिना खूप सुशिक्षित आणि चतुरस्त्र व्यक्ती होत्या. लेनिनग्राद या सोविएत शहरातील राष्ट्रीय विद्यापीठात भारतविज्ञानाच्या विभागात त्यांनी आयुष्यभर प्राध्यापिका म्हणून काम केलं. त्या रशियन विद्यार्थ्यांना संस्कृत, हिंदी आणि मराठी भाषा शिकवत. शिवाय भारतीय भाषाशास्त्रावर व्याख्यानं देत. भारतविज्ञान–क्षेत्रात सुप्रसिद्ध सोविएत अकादेमी सदस्य अलेक्सेंड बारान्निकोव त्यांचे गुरू !

डॉ. तात्याना कातेनिना यांनी तीन पुस्तकं लिहिली. त्यांपैकी **मराठी भाषा** आणि **मराठी व्याकरणाची मूलतत्त्वं** ही दोन रशियन भाषेतील पुस्तकं १९६३ मध्ये प्रसिद्ध झाल्यानंतर त्यांना नागपूर विद्यापीठाची सन्मानसूचक डॉक्टरेट मिळाली. सोविएत संघामधे मराठी भाषेविषयी ही दोन पुस्तकं सर्वप्रथम आहेत, जंगलात किंवा डोंगरात पहिला रस्ता शोधून काढणाऱ्या माणसाचं काम सर्वांत कष्टाचं आणि जिकिरीचं असतं, म्हणजे कोणाचाही नवीन क्षेत्रात पुढाकार घेणाऱ्यांना नाव

होण्यापूर्वी त्रास जास्त होतो. तसं रशियन भाषेच्या 'डोंगरात' मराठीचा पहिला 'घाट' बांधायचं काम डॉ. तात्याना कातेनिना यांच्यावर सोपवण्यात आलं. आणि त्यांनी ते काम उत्तम केलं. मराठी भाषेचं जे मूलतत्त्वशोधन त्यांनी केलं, ते अतिशय मूलगामी आणि तपशीलवार आहे. बारीकसारीक गोष्टीही त्यातून सुटलेल्या नाहीत.

आजपर्यंत सोविएत संघामधे फक्त चार माणसांनी मराठी भाषाशास्त्राचं विशेष संशोधन करून डॉक्टरेट केली. या माणसांमधे डॉ. तात्याना कातेनिना यांचा नंबर पहिला आहे. मराठी भाषेचाच नव्हे, तर मराठी इतिहासाचा आणि वाङ्मयाच्या त्या फार गाढया पंडिता होत्या. त्यांच्याशी बोलताना कधी ज्ञानेश्वरांच्या काही ओव्या, कधी तुकारामाचे काही अभंग कानी पडायचे. ते केव्हाही बौद्धिक प्रदर्शन नव्हतं. तर आपल्या विचाराला पुष्टी म्हणून त्या या वचनांचा आधार देत. मराठी वारकरी सांप्रदायाचं काव्य इतक्या सहजतेनं म्हणून दाखवणारी अशी दुसरी व्यक्ती मला सोविएत संघामधे आढळलेली नाही आणि आढळेल, असं वाटत नाही. डॉ. तात्याना कातेनिया यांचं ज्ञान भारतापुरतंच मर्यादित होतं, असं समजणं चूक ठरेल. पण मी मात्र त्यांच्याशी खास करून मराठी भाषेच्या आणि वाङ्मयाच्या समस्यांवर चर्चा करत असे. म्हणूनच ही अशी उदाहरणं मला साहजिकच लगेच सुचतात.

डॉ. तात्याना कातेनिना यांच्या मनात मराठी विषयासंबंधी कितीतरी योजना होत्या ! आणि किती तरी अपूर्ण राहिल्या आहेत ! किती तरी कल्पना साकार झाल्याच नाहीत ! याचं मुख्य कारण असं, की आपल्या स्वतःच्या शोधकार्याच्या योजना अमलात आणण्याऐवजी विद्यार्थ्यांना शिकवण्याचं व्रत सर्वांत महत्त्वाचं त्यांना वाटायचं. शिवाय स्वभावही नम्र आणि निरभिमानी ! त्यांना आपल्या कर्तृत्वाची खात्री होती, मग त्याकडे खास लक्ष कशाला वेधायचं ?

डॉ. तात्याना कातेनिना त्यांची प्रकृती कधीच चांगली नव्हती. त्यांना दमा आणि श्वसनाची दुसरी दुखणी होती. यामुळे आपल्या आयुष्याच्या प्रेयसाशी म्हणजे, भारताशी आणि महाराष्ट्राशी एकदाच आणि तीही अल्प भेट होऊ शकली. पण आपल्या कल्पनाशक्तीनं त्यांनी कितीदा हा प्रवास केला होता. स्वतःच्या प्रकृतीची पर्वा न करता, कधीच जपून न राहता नेहमी आपल्या विद्यार्थ्यांची त्या काळजी घेत. त्यांना भारताचा सर्वांगीण अभ्यास करायला उत्तेजन देत. त्यांनी मांडलेल्या पण लिहून ठेवलेल्या कल्पना आणि विचार मात्र त्यांच्या विद्यार्थ्यांच्या लक्षात सदा राहतील.

मी मॉस्कोमध्ये राहत आले आणि डॉ. तात्याना कातेनिना यांची प्रत्यक्ष विद्यार्थिनी कधीच नव्हते. पण मराठीचा अभ्यास सुरू करताच, त्यांची भाषेची पुस्तकं मला अपरिहार्य वाटली. नंतर मराठी ध्वनि-विचाराविषयीचा डॉक्टरेटचा प्रबंध

लिहिताना मी मुद्दामच लेनिनग्रादला जाऊन त्यांच्याशी ओळख करून घेतली. त्यांच्या सरळ आणि समृद्ध व्यक्तित्वानं माझ्यावर फार मोठा प्रभाव पाडला. ओळख होताच आमच्या अगदी मनमोकळच्या गप्पा आल्या. त्या माझ्याहून २५–३० वर्षांनी वडील होत्या; पण तशी जाणीव अजिबात होत नसे. त्यांच्यापुढे आपले विचार मांडताना काही संकोच वगैरे वाटत नसे. त्या दुसऱ्या माणसाला मदत करायला नेहमी तत्पर होत्या. त्यांचे सल्ले फार मोलाचे असत. तरी त्यांची चाचणी अति कडक असे.

आमची मैत्री जमून तीन-चार वर्षांनंतर मी तुकारामांकडे वळून त्यांच्या चरित्राविषयी एक लेख लिहिला तो एका शास्त्रीय मासिकात प्रसिद्ध करावयाला देण्यापूर्वी मी डॉ. तात्याना कातेनिना यांच्याकडे अभिप्रायासाठी पाठवला. उत्तर ताबडतोब आलं. ' तुकारामांविषयी तुम्हांला उत्सुकता निर्माण आली आहे, याबद्दल मला अत्यानंद होतोय्. असं सुरुवातीला लिहिण्यात आलं. ' पण तुमचा लेख वाचून अजून काही महत्त्वाचे प्रश्न सुटलेले नाहीत, असं मला वाटतं ' आणि मग प्रश्नांची यादी. त्या वेळी मी माझा लेख प्रसिद्ध करायचं टाळलं.

अधूनमधून कामानिमित्त किंवा नुसता दम घ्यायला लेनिनग्रादला येताच मी डॉ. तात्याना कातेनिना यांची नेहमी भेट घ्यायची. त्यांच्याशी बोलण्याच्या नादात कधी तीन, कधी पाच तास कसे जायचे, ते कधीच कळायचं नाही. मग त्यांचा निरोप घेताना मला नेहमी स्फूर्तीचा अनुभव यायचा.

डॉ. तात्याना कातेनिना यांच्याकडून स्फूर्तीचा पुरेपूर लाभ घेऊन त्यांचे विद्यार्थी मराठीच्या क्षेत्रात काम करत आहेत. व्लदीमिर लाम्शुकोव यांनी ' मराठी वाङ्मयाचा संक्षिप्त इतिहास ' आणि ' हरी नारायण आपटे ' अशा नावाची दोन पुस्तकं प्रसिद्ध केली. नीना कारनोदेम्स्काया यांनी वि. स. खांडेकरांच्या **ययाति**चं आणि अरुण साधू यांच्या **मुंबई, दिनांक**चं भाषांतर केलं, तेव्हा सोविएत वाचकांचं लक्ष मराठी वाङ्मयाकडं गेलं, कारण त्यापूर्वी मराठीतून फक्त पाच ते सात गोष्टींचं भाषांतर प्रसिद्ध करण्यात आलं होतं. वरील कुज्नेत्सोव हे **ज्ञानेश्वरी**चं पूर्ण भाषांतर करून आता त्याची पद्य अनुवादित आवृत्ती तयार करत आहेत. प्रथम त्यांच्या मनात असा विचार नव्हता. गद्यात भाषांतर करण्यात खूप वर्षं गेली. पण **ज्ञानेश्वरी** अर्धी भाषांतरित करून झाल्यानंतर आपोआप तिचा अनुवाद पद्यात्मक लयप्रधान होऊ लागला. डॉ. तात्याना कातेनिना यांचे आणखी एक विद्यार्थी निकोलाय सिदेलेव यांनी विंदा करंदीकर यांच्या साहित्यावर संशोधन केलं. म्हणजे ही सगळी माणसं मराठी भाषेवरील प्रेमाच्या वाटेनं पुढं जात आहेत.

त्यांच्यापेक्षा माझी परिस्थिती थोडी वेगळी आहे मीही मराठीवर प्रेम करते, मीही रोज झोपण्यापूर्वी एखादी मराठी कादंबरी वाचते किंवा मराठी मित्रमैत्रिणींना

पत्र लिहून पाठवते. पण माझे मराठीचे गुरू भारतात आहेत. तरी डॉ. तात्याना कातेनिना यांच्यासारखं मराठीच्या ज्ञानाच्या क्षेत्रात सामाजिक आणि सर्वोच्च प्रतिष्ठा मिळवलेलं असं माणूस आमच्या देशात नाही. आणि या दृष्टीनं मीही त्यांना मराठीच्या माझ्या गुरुस्थानी मानलेलं आहे.

हल्ली मी महाराष्ट्रातील सुप्रसिद्ध भाषाशास्त्रज्ञ डॉ अशोक केळकर आणि डेक्कन कॉलेजच्या पश्चिम भारतीय भाषा केन्द्रामध्ये काम करणाऱ्या श्रीमती सुमन बेलवलकर यांच्या सहकार्यानं उच्च शिक्षण प्राप्त करणाऱ्या रशियन विद्यार्थ्यांसाठी मराठी भाषेचं पाठ्यपुस्तक लिहीत आहे. सोविएत संघामध्ये मराठी भाषेचा विशेष अभ्यास करण्यासाठी हे पहिलंच पुस्तक होईल. पाठ्यपुस्तक तयार करणं हे काम सोपं नाही. शिवाय सहलेखकही दूर आहेत- आम्ही पत्रव्यवहार करतो, आमच्या भेटी दोनदाच झाल्या. पण हवं तेव्हा त्यांना प्रश्न विचारता येत नाहीत. पूर्वी डॉ. तात्याना कातेनिना मला भेटून प्रश्न विचारायच्या 'काम कसं चाललंय् ? वेळ लावू नका. हे पाठ्यपुस्तक फार उपयोगी पडेल.' त्यांच्याशी गप्पा नेहमी उत्साहवर्धक व्हायच्या, वैचारिक पातळीवर त्यांच्याशी केलेल्या चर्चेतून केवळ मराठीच्या दृष्टीने नव्हे, तर ज्ञानाच्या समग्र क्षेत्रातील निरनिराळ्या विषयांवर बुद्धीला खाद्य मिळत असे. त्यांची बुद्धी अतिशय तीक्ष्ण होती. यामुळे काही विषयांबद्दल मला विशेष गाढ समजूत पटली.

आपल्या टेबलाशी बसून पहिल्या वर्षाच्या मराठी भाषा शिकणाऱ्या विद्यार्थ्यांच्या वह्या तपासताना फ़ेब्रुआरी १९८७ मध्ये त्यांचं आकस्मिक अकाली निधन झालं. याबद्दल उदासीनता कमी होत नाही. पण त्यांची प्रतिमा सदैव अंतरी आहे. तिला साक्ष ठेवून मराठी भाषेचं पाठ्यपुस्तक पूर्ण करणं हे मी आपलं कर्तव्य समजते.

**भारतीय भाषाशास्त्र विभाग, इ इन्स्तितुत स्त्रान आझीइ इ आफ्रीकि, मॉस्को शासकीय विद्यापीठ, १८ मार्क्स प्रोस्पेक्त, मॉस्को**

**इतिकथन** : चिरस्मृत प्र. के. अत्रे यांना लेनिनग्रादमध्ये मराठीत बोलणारी एक रशियन तरुणी भेटली होती. आणि तिच्याबद्दल त्यांनी लिहिलेही होते. ती म्हणजेच या तात्याना कातेनिना. त्यांना भावांजली वाहणारे हे लेखिकेने रेडियो मॉस्कोवर केलेले भाषण. रशियन भाषेत भाषा आणि वाङ्मय यांच्या अभ्यासाला एकत्रित पणॅ फिलोलोगी म्हणतात. इथे या शब्दाचा अनुवाद भाषाशास्त्र असा केला आहे. तुकारामांच्या काही अभंगांचा रशियन अनुवाद काही वर्षांपूर्वी भारतीय साहित्याचा परिचय करून देणाऱ्या एका ग्रंथात समाविष्ट झाला आहे.

## प्रयोगविवेक । पत्ता कसा लिहावा

आपल्याला स्वतःचा किंवा इतर कुणाचा पत्ता लिहायचे प्रसंग पुष्कळदा येतात– उदाहरणार्थ, पत्राच्या सुरुवातीला किंवा शेवटी, पोस्टात टाकायचे कार्ड, पाकीट, पार्सल इत्यादींवर, सभासदांची यादी तयार करताना पण पत्ता नीट कसा लिहायचा याचा विचार बहुधा केलेला दिसत नाही.

पत्ता लिहायच्या दोन पद्धती आहेत : इंग्लिश भाषकांची पद्धत म्हणजे व्यक्तीचे वा संस्थेचे नाव आणि नंतर अधिकाधिक व्यापक स्थलनिर्देश ( उदाहरणार्थ घर, रस्ता, गाव, देश), दुसरी अन्य युरोपियनांची पद्धत म्हणजे व्यक्तीचे वा संस्थेचे नाव आणि नंतर कमी कमी व्यापक स्थलनिर्देश ( उदाहरणार्थ देश, गाव, रस्ता, घर). भारतात पहिलीच पद्धत रूढ झालेली आहे आणि खुद्द युरोपातही तिचा प्रचार वाढत आहे. पत्ता वाचणाराला तो पुष्कळदा घाईत वाचावा लागतो आणि पुष्कळदा सगळा पत्ता वाचण्याची गरज नसते (उदाहरणार्थ, पोस्टातला सॉर्टर). थोडया विचारांती लक्षात येईल, की एकदा व्यक्तीच्या किंवा संस्थेच्या नावाने सुरुवात करायचे ठरले, की इंग्लिश भाषकांची पद्धत सोयीची आहे. (सॉर्टर अर्थात पत्ता खालून वर वाचत जाणार).

हा क्रम पुष्कळदा संभाळला जात नाही– ग्राह्य क्रम प्रथम देऊन नंतर त्याज्य क्रम दिला आहे.

विष्णुनिवास, २०४ नारायण पेठ– २०४ नारायण पेठ, विष्णुनिवास

ए–२ परिमल, परिमल ए– २

२०४ नारायण पेठ, न. चिं. केळकर रस्ता– न. चिं केळकर रस्ता, २०४ नारायण, २०४ न. चिं. केळकर रस्ता, नारायण पेठ

द्विरुक्ति टाळावी.

पुणे पिन ४११००४– पुणे ४ पिन ४११००४

पत्ता लिहिण्यासाठी जागा कमी असते. पत्ता घाईत लिहावा आणि वाचावा लागतो. या गोष्टी लक्षात घेऊन पत्त्यात संक्षेप करायला हरकत नाही. मात्र त्यामुळे पत्ता दुर्बोध होता कामा नये. (तारेच्या बाबतीत असे होण्याचा धोका असतो.)

विष्णुनिवास, २०४ नारायण पेठ, न. चिं. केळकर रस्ता.

याचा संक्षेप

२०४ नारायण पेठ

किंवा

२०४ न. चिं. केळकर रस्ता
असा होऊ शकतो. स्थलनिर्देशातला 'पेठ' हा शब्द किंवा 'न. चिं.' ही आद्याक्षरे गाळून चालते. 'घरांक' किंवा 'इमारत क्रमांक' किंवा 'गाळा क्रमांक' किंवा 'पिन' किंवा 'प्रेषक' हे शब्द गाळून चालते.

अनावश्यक नोंदी टाळाव्या. उदाहरणार्थ, व्यक्तीच्या नावाअगोदर 'तीर्थरूप' किंवा 'परमपूज्य' हे पत्त्यात घालण्याची गरज नाही. व्यक्तिनाम, पदनाम, संस्था-नाम अशी तिहेरी नोंद घालण्याची गरज आहे का, याचा विचार करावा. पत्र त्या व्यक्तीनेच फोडले पाहिजे असे नाही, तिच्या गैरहजेरीत दुसऱ्या जबाबदार व्यक्तीने फोडायला हरकत नाही, किंबहुना ते फोडून तातडीने कारवाई करावी, अशी स्थिती असली, तर केवळ पदनाम, संस्थानाम एवढेच घालणे पुरे.

पत्त्यामध्ये आकडे आणि अक्षरे क्रम दाखवण्यासाठी येऊ शकतात. तर हे आकडे किंवा अक्षरे बिनचूक आहेत, योग्य क्रमाने दिलेले आहेत, आणि जरूर त्या । किंवा – या विरामचिन्हांनिशी दिलेले आहेत, असे पाहावे. त्यांच्या शेवटी किंवा अगोदर स्वल्पविराम नको.

पुणे ४११ ००४– पुणे, ४११ ००४.

३०१ बी ४ नारायण पेठ– ३०१ बी ४, नारायण पेठ.

या ठिकाणी दोन आकड्यांच्या मध्ये अक्षर आल्यामुळे दंड किंवा डॅश देण्याची गरज नाही. इंग्रजी अक्षरे ए, बी, सी अशीच द्यावी, अ ब क अशी देऊ नयेत आणि c म्हणजे क का स, e i y यांचे काय यांसारख्या घोळात पडू नये.

ज्या ठिकाणी पत्त्यामधील नोंदी एकापुढे एक लिहायच्या नसतील, तर एकाखाली एक लिहायच्या आहेत, त्याठिकाणी पत्त्याची मांडणी (लेआउट) कशी करायची, हे ठरवावे लागते. काही अंशी हा रुचीचा प्रश्न आहे, काही अंशी प्रघाताचा.

| | | |
|---|---|---|
| महाराष्ट्र बँक | महाराष्ट्र बँक | महाराष्ट्र बँक |
| डेक्कन जिमखाना | डेक्कन जिमखाना | डेक्कन जिमखाना |
| पुणे ४११ ००४ | पुणे ४११ ००४ | पुणे ४११ ००४ |

म्हणजे सरळ (लेफ्टजस्टिफाइड), उतरती (इंडेंटेड), आणि संमिताकार (सेंटर्ड) असे तीन प्रकार झाले. ओळीच्या शेवटचा स्वल्पविराम किंवा पूर्णविराम गाळला, तरी चालतो, किंबहुना सहसा तो गाळतातच.

पत्र पाठवणाराचा पत्ता लिहिण्याच्या तीन पद्धती आहेत– पाकिटाच्या मागच्या बाजूला किंवा पुढच्या बाजूला खालच्या डाव्या कोपऱ्यात किंवा पुढच्या बाजूला वरच्या डाव्या कोपऱ्यात. यांपैकी तिसरी पद्धत जास्त सोयीची वाटते.

पत्ता लिहिताना काही इंग्रजी शब्द विशेषनामांचा भाग म्हणून केवळ लिप्यंतरित ठेवावे लागतात.

ईस्ट स्ट्रीट
हिंदू कॉलनी
मेन स्ट्रीट
कफ परेड
पण काही मराठीत ठेवणे सहज शक्य आहे.
महात्मा गांधी मार्ग–महात्मा गांधी रोड
लक्ष्मी रस्ता– लक्ष्मी रोड
परिमल सहनिवास– परिमल अपार्टमेंट्स्, परिमल सोसायटी
अंधेरी पश्चिम– अंधेरी वेस्ट
काही नेहमी लागणारे शब्द पुढे दिले आहेत :
care of, c/o – द्वारा : अमुक
via अमुक – अमुक मार्गे
post ( office ) box ( number ) - टपालपेटी (क्रमांक)
off अमुक रस्ता – अमुक रस्त्यावरून
corss road – काटरस्ता
( express ) highway – (द्रुत) महामार्ग
layout - मांडणी
colony – वसाहत
reclamation – पुन:प्रापित जमीन

मराठी विशेषनामे इंग्रजीत लिहिण्याची तर काहीच गरज नाही. उदाहरणार्थ, मुंबई, शीव, वांदरे या ऐवजी बाँबे, सायन, बँड्रा किंवा बांदरा.

परप्रांतांमधले पत्ते लिहिताना ते देवनागरीत असले, तरी ते मराठीत न लिहिता हिंदीत लिहायला पाहिजेत, हे भान ठेवावे. तीच गोष्ट परप्रांतांमधून महाराष्ट्रात पत्र धाडताना.

# शाळा मागची सुटे ना

तारा भवाळकर

आमच्या लहानपणी आम्ही 'शाळे'त जात होतो. आपल्यापैकीही बरेचजण जात असतील, कारण अजून 'शाळे'चं 'स्कूल' झालेलं नव्हत. मग 'शाळेसी रोज जाताना, मज विघ्ने येती नाना!' हा अनुभव यायचा. शाळा हा सुरवातीला तरी फारसा सुखावह प्रकार नव्हता. ही 'शाळा' बहुधा सर्वपरिचित आहे.

थोडं मोठं झाल्यावर घरातले मोठे भाऊ 'पाठशाळे'त जाऊ लागले. 'पाठशाळे'त फक्त संस्कृत शिकवीत. पण तरी आपल्या नेहमीच्या शाळेचीच ही थोडी गंभीर असलेली मोठी बहीण वाटली.

मग कुठंतरी बखरीची ओळख झाली आणि तिथं 'घोडशाळा', 'हत्तीशाळा' भेटली. आधी वाटलं आपल्याला शिकण्यासाठी जशी शाळा असते, तशीच घोड्यांना आणि हत्तींना शिकण्यासाठी ही शाळा असेल. पण मग कळलं जिथं घोड्यांना नुसतं बांधून ठेवतात तो मोठा तबेला किंवा जिथं हत्तींना ठाणबंद करतात त्या मोठ्या जागा म्हणजे त्यांच्या 'शाळा' होत. तिथं शिक्षणाचा (पक्षी हिंदीमध्ये, शिक्षा) काही संबंध नाही. त्यांना बांधून ठेवीत असल्याने वेगळ्या अर्थाने त्यांना शिक्षा (पक्षी हिंदीमध्ये, सजा) होत असेल कदाचित्. पण ही शाळा आमच्या नेहमीच्या मुलांच्या शाळेपेक्षा किंवा संस्कृत पाठशाळेपेक्षा अगदीच वेगळी होती.

जुन्या ऐतिहासिक पुस्तकातच पुढं लोहारशाळा भेटली. जुन्या ग्रामव्यवस्थेच्या वर्णनातही 'सुतारशाळा', 'लोहारशाळा', 'शिल्पशाळा' सापडल्या. 'लोहारशाळा' खूप मोठी झाली की तो 'कारखाना' झाल्याचंही ऐतिहासिक पुस्तकांच्या सान्निध्यातच समजलं.

मग वय वाढत गेलं तेव्हा आपण फारच मोठे आणि शहाणे झालो आणि उगीचच बरं वाटायला लागलं. याचं एक कारण म्हणजे आता 'शाळा' कायमची संपली होती. शालांत परीक्षेचं प्रमाणपत्र हाती आलं होतं. मी शाळा सोडली तरी शाळा मला सोडायला तयार नव्हती. मोठ्या शहाणपणाचा आव आणून कॉलेजच्या वर्गात उभं राहून, "सर, नाटकशाळा म्हणजे काय?" हा प्रश्न विचारून स्वतःची प्रचंड फजिती करून घेतली होती. खुद्द 'सर' आणि वर्गातली जाणती जनता का हसत होती, ते बराच वेळ कळलंच नाही, आणि जेव्हा कळलं तेव्हा उगीचच संकोच

वाटला. वाटलं चला आता तरी 'शाळा सुटली' असेल आपल्या मागची ! पण कसलं काय ?

य. न. केळकरांनी संपादित केलेल्या लावण्या वाचतांना एक विरहिणी पुन्हा शाळा आठवू लागली तेव्हा मात्र जीव हैराण झाला कारण या विरहिणीला आधी सांगितलेल्या कुठल्याच शाळेशी काही देणं-घेणं नव्हतं. तरी ती लटक्या रूसव्यानं आपल्या प्रियकराला म्हणते,

"मला लागली आपली शाळा !"

आता ही शाळा म्हणजे काय ? मग आपटे, मोहस्वर्थ, कृ. पां. कुलकर्णी सगळ्याचे कोश धुंडाळले, **महाराष्ट्रशब्दकोश**ही पाहिला. पण इथं चपखल बसेल असा अर्थ कुठे सापडेना. 'खोली, सभागृह',जागा, संप्रदाय, शिक्षणमंदिर' असे सगळे आधी भेटलेलेच अर्थ सापडले. पण 'पण मला लागली आपली शाळा !'चा अर्थ काही केल्या उलगडेना पुन्हा लावणी वाचली आणि पान उलटलं. आधी लक्षातच आलं नव्हतं. खाली चक्क तळटीप होती आणि त्यात "शाळा"चा अर्थ दिला होता— शाळा 'शिस्त' पण दुसराच एक अर्थ या संदर्भात चपखल बसणारा होता. शाळा —'लळा, आवड, चटक' ही नवीनच एक 'शाळा' सापडली. कोणत्याही शब्द कोशात नसलेला शाळा शब्दाचा लोकाचारात असलेला अर्थच भाषा वाढवतो; जिवंत ठेवतो, हेच खरं ! व्यवहारातली भाषा शब्द कोशात सामावणं कठीण असल्याचा आणखी एक प्रत्यय आला.

सांगलीला नुकतेच आलो होतो. वीसएक वर्षांपूर्वी. निवडणुकीचं भाषण चाललं होतं कोणा स्थानिक नेत्याचं अर्थात् विरोधकांचा समाचार आलाच. 'विरोधकांनी काहीही सांगावं आणि आम्ही ते मानावं की काय ?' असा एकूण सूर आणि मग पुढारी महाशय एकदम आवाज चढवून म्हणाले, '—ला ! आमी काय दुदखुळं हाय काय ? पार शाळा करायला बघत्यात आमची !' या शाळे'नं आणखी एकदा धक्का दिला. मग मात्र असली 'शाळा' भेटतच राहिली. चित्रपटाला जायचं ठरवून एखादा मित्र आला नाही तर पोरं म्हणत 'काय लेका शाळा केलीस आमची !' बस वेळेवर आली नाही, 'एस. टी. ने पार शाळा केली' कुठल्या कार्यक्रमाला काही अपेक्षेनं जावं आणि तो रंगला नाही तरी प्रेक्षकांची 'शाळा' होत असल्याचा अनुभव आला.

एकूण 'शाळा' या शब्दानं माझी वारंवार पार 'शाळा करून टाकली' आहे. अजून कितीदा माझी 'शाळा होणार' आहे कोण जाणे ? (शाळा होणे/करणे हा वाक्प्रचारही कोणत्याच शब्दकोशात नाही.)

**मराठी विभाग, श्रीमती चंपाबेन शाह महिला विद्यालय, महावीरनगर, सांगली ४१६४१६**

## ' किंवा ' म्हणजे ' आणि ' तर नव्हे ?

प्रशासकीय व्यवहारात, समजा, अशी शब्दयोजना इंग्रजीत असली— from the date of retirement or from the date of death, whichever is earlier तर त्याचा मराठी सहज सुचणारा अनुवाद असा : सेवानिवृत्तीची तारीख आणि मृत्यूची तारीख यांच्यापैकी जी अगोदरची असेल, त्या तारखेपासून.

आता यावर एखाद्या विद्वानाने असा आक्षेप घेतला, की इंग्रजीत or असताना मराठीत ' आणि ' कसे चालेल ?

तर उत्तर काय द्यायचे ?

बरे, या आक्षेपाला मान तुकवून अनुवादात ' आणि ' ऐवजी ' किंवा ' घातले, तरी बरोबर वाटत नाही. का ?

**गीता सुभाष भागवत, नागपूर**

इंग्रजीत or शब्दामध्ये दोन पर्यायांमधून निवड करायची आहे हा अर्थ आहे. तो मराठीत ' यांच्यापैकी ' या शब्दातून आणला आहे, or मधून हा अर्थ वजा घातला तर राहते ' आणि ', म्हणून ' अमुक आणि तमुक यांच्यापैकी ' असेच पाहिजे, ' अमुक किंवा तमुक यांच्यापैकी ' म्हटले, तर पुनरुक्तीचा दोष संभवतो.

## कन्नड–मराठी जाणकारांसाठी

कन्नड भाषेमध्ये ' भक्त/भावी ' असे विरुद्धार्थी शब्द आहेत असे नुकतेच वाचले. मराठीतही ' मानभावी ' असा शब्द आहेच. त्याचे मूळ ' महानुभावी ' याचे उप-हासात्मक रूप असा कुठेतरी व्युत्पत्ती-शोध स्मरतो.

कन्नड–मराठी जाणकार यावर प्रकाश टाकू शकतील का ?

दहाव्या–अकराव्या शतकातले अल्लणप्रभु, बसवण्णा, देवर दासीमय्या, महादेवी अक्का असे वीरशैव संत व नंतरच्या काळातले मराठी भक्तिमार्गी वैष्णव संत यांच्या उपमा–उत्प्रेक्षा, संकल्पना बऱ्याच समान आढळल्या. मराठीत असा तौलनिक अभ्यास झालेला असेलच. कोणी संदर्भ कळवील का ?

मराठीच्या जडणी-घडणीतला कन्नड प्रवाह महत्त्वाचा ठरावा.





अनुक्रमणिका

मी मूळ कन्नड वाचलेले नाही. ए. के. रामानुजन् याच्या **स्पीकिंग ऑव्ह शिव** (पेंग्विन १९७३) या पुस्तकातल्या इंग्लिश भाषांतरावर आधारित ह्या कल्पना आहेत.

**लक्ष्मण न. गोडबोले,**

**स्पर्श, ४०३ जनकल्याणनगर, माळवणी, मालाड-मारवे रस्ता, मुंबई ४०० ०९५**

## शब्द हवा आहे

'इंटरेस्टिंग' शब्दाचे मराठी भाषांतर करणे मला आज चाळीस वर्षांत जमले नाही– ते काय असावे ? 'मनोरंजक ?' नाही. 'मजेदार ?' असेल कदाचित.

**गौरी देशपांडे** (एका पत्रातून)

---



## विदग्ध वैचारिकता

**आ. ना. पेडणेकर**

"तरीदेखील रसेलच्या मृत्यूनंतर तेरा वर्षांनी त्याचे रसरशीत जीवनकण, ज्ञान-**कण** भोवतालात विखरून देण्याचा निर्णय आपण घेतो आहोत. ‹

कारण त्यामुळे हा आपल्याला आवडलेला माणूस अनेकांच्या मनांत **मेकॅनो**सारखा पसरून जाईल. त्यातून त्याला नवे **कोंभ धुमारे** फुटतील, तो एका हवेत भरून राहणारा **अमूर्त संस्कार** ठरेल..."

पद्मजा फाटक, **सोनेलुमियर** (पृष्ठ १०१)

Son et lumiere म्हणजे ध्वनिप्रकाशाचा खेळ करून मांडलेली एक कला. जाड ठसा अर्थात मागाहून घातलेला. बिचारा रसेल !

**अलिबाग महाविद्यालय, अलिबाग ४०२२०१**

## न झालेला संवाद–पुन्हा एकदा

**पूर्वसंदर्भ** : **भाषा आणि जीवन** ४:४ दिवाळी १९८६ पृ. ३९ वर 'कानी पड-लेला संवाद' म्हणून **पत्रसारांश** या पत्र–नियतकालिकावरून एक पानपूरक दिले होते. त्यावर विश्राम बेडेकरांकडून आलेले पत्र ५ : १ हिवाळी १९८७ पृष्ठ २५ अंशतः दिले होते व संपादकीय दिलगिरी व्यक्त केली होती.

आता **पत्रसारांशचे** संपादक श्रीकृष्ण बेडेकर यांच्याकडून आलेले पत्र :

'साधारणपणे जून ८३ मध्ये मुंबईतील माझे मित्र श्री. म. न. वांकर...यांच्या दादर–माटुंगा येथील फ्लॅटवरून दुपारी केव्हातरी मी...बेडेकरांना फोन लावला होता आणि विश्राम बेडेकरच बोलताहेत ही खात्री करणाऱ्या माझ्या प्रश्नाला होकार आल्यावरच पुढील 'संवाद' सुरू झाला...ते हा झाला प्रकार एव्हाना विसरलेही असतील...वृद्ध अन् विद्वान बेडेकरांना सहज लहर आली म्हणून बदनाम करून मला काही...पुरस्कार मिळणार नव्हता...त्यांची अनवाणी वाणी... मला तरी अनपेक्षित होती माझ्या भावुक मनात तिचे पडसाद नंतर कितीतरी दिवस उमटत राहिले... [बेडेकरांच्या खुलाशामुळे] तुम्ही [निष्कारण] दिलगिरी व्यक्त का केली ? त्यामुळे माझ्या प्रामाणिकपणाला विनाकारण नामुष्की पत्करावी लागली. पुढील अंकी ह्या चुकीची दुरूस्ती व्हावी ही विनंती.'

नो कॉमेंट. (याला कुणी योग्य प्रतिशब्द सुचवील काय ?)–संपादक

**निषिद्ध मिलन**

'माझ्या सगळ्या रचना– कविता काय किंवा कथा-कादंबऱ्या काय––बेवारशी पोरांप्रमाणे आहेत हे मी जाणते. माझ्या जगाच्या वास्तवानं माझ्या स्वप्नांशी प्रेम केलं. त्यांच्या निषिद्ध मिलनातून ह्या सर्व रचना निर्माण झाल्या...बेकायदेशीर मुलांच्या नशिबी जे असतं, तेच सर्व यांच्याही नशिबी येईल. यांना आयुष्यभर आपल्या साहित्यिक समाजाच्या कपाळावरच्या आठ्या बघाव्या लागतील.'

**अमृता प्रीतम, रसीदी टिकट**

**प्रेषक व अनुवादक : पुरुषोत्तम पाटील, देवपुर, धुळे** ४२४ ००२

## दुरुस्तीची चूक

संदर्भ : जाई निंबकर, लहान मुलांची भाषा : काही नोंदी, **भाषा आणि जीवन** ५:१ हिवाळा १९८७, पृ. २१–२.

लेखिका सांगते आहे : माझ्याकडे पेरू तोडायला एक जोडपं येतं, त्यातली बाई माझ्या नातीच्या दृष्टीने जास्त महत्त्वाची व्यक्ती, तेव्हा ती दोघांना 'माळीणबाई आणि माळीणबुवा' असं म्हणते.

प्रत्यक्ष छापले गेले आहे 'माळीणबाई आणि माळीबुवा'! म्हणजे मूळच, मुद्दाच हरवला. कुणीतरी 'चुकून' माळीणबुवा 'दुरुस्त' करून 'माळीबुवा' करून घेतले. चुकीबद्दल संपादक दिलगीर आहेत.

## पैसे पाठवण्याबद्दल महत्त्वाची सूचना

पत्रिकेची वर्गणी किंवा अन्य पैशाचा भरणा व्यवस्थापकीय पत्त्यावर करताना चेक किंवा ड्राफ्ट यांच्या जोडीला मनीऑर्डरने पैसे स्वीकारण्याची पद्धत आतापर्यंत ठेवली आहे. पण मनीऑर्डर स्वीकारण्याची तजवीज नेहमी करणे जिकिरीचे होते असा आजवरचा अनुभव आहे. तरी शक्यतो मनीऑर्डरने पैसे पाठवू नयेत, फक्त चेक किंवा ड्राफ्ट या मार्गांने पैसे पाठवावे किंवा समक्ष द्यावेत अशी सर्वांना विनंती आहे. दुसरा इलाज नसला तरच मनीऑर्डर करावी.

## लेखकाच्या शोधात साठ विषय

**भाषा आणि जीवन** ३:२ उन्हाळा १९८५ पृ. ४२–४३ वर एक यादी केव्हा-पासून आपली बाट पाहत आहे. तिच्याकडे आपण सगळ्यांनी एक नजर टाकावी ही विनंती.

## लेखकांना सूचना

मुद्रणप्रत हस्तलिखित असो किंवा टंकलिखित असो, पण ती सुवाच्य व पानाच्या एकाच बाजूस असावी. (उदाहरणार्थ सर्व टिंबे ठळक काढावी, खोडलेल्या अक्षरांची दुरुस्ती करताना गिचमीड टाळावी, शाई पसरलेली कार्बनप्रत पाठवू नये.) सर्व पाने सारख्याच आकाराची असावी, पानाचा आकार फूलस्कॅप चतुष्पत्री $८\frac{१}{२}\times६\frac{३}{४}$ इंच २१.५×१८.५ सेंटिमीटर यापेक्षा लहान नसावा, शक्यतो पानाचा आकार फूलस्कॅप द्विपत्री ($१३\frac{१}{२}\times८\frac{१}{२}$ इंच, ३७×२१.५ सेंटिमीटर) असावा. पाने एकत्र बांधायला टाचणी किंवा क्लिप पुरे, ती पक्की शिवू किंवा स्टेपल करू नयेत. ओळीओळीमध्ये आणि पानाच्या चारही बाजूला व्यवस्थित अंतर असू द्या. थोडक्यात गबाळेपणा टाकून मुद्रणप्रत तयार करावी, पाठवण्यापूर्वी स्वतः एकदा तपासून पहावी, आणि संपादक, मुद्रक यांचे काम सोपे करावे.

लेखासोबत चित्रे, आकृत्या, कोष्टके, इत्यादी सामग्री द्यायची झाल्यास ती मजकुराच्या पानावर न टाकता स्वतंत्र पानांवर मुद्रणप्रतीच्या शेवटी जोडावी. अर्थात त्यांच्यासोबतचा खुलासेवजा मजकूर, कोष्टकाचा मथळा, इत्यादी सामग्रीच्या बरोबरच राहावा. मुख्य मजकुरात योग्य जागी वाचकांच्या आणि मुद्रकांच्या माहितीसाठी कंसात ' चित्र / आकृती / कोष्टक १/२ ..पाहा ' अशी सूचना अवश्य टाकावी.

लेखन टोपणनावाने प्रसिद्ध करायचे असो किंवा नसो, पण लेखनाच्या शेवटी थोडी जागा सोडून लेखकाने आपले नाव आणि पत्रव्यवहाराचा संपूर्ण पत्ता द्यावा. व्यावसायिक पत्ता वेगळा असला, तर तोही नीट द्यावा. नावामधली आद्याक्षरे लेखनाप्रमाणे न देता मराठी लेखनाप्रमाणे द्यावी. पत्ते पिनकोडसह द्यावे.

निर्णय शक्यतो एक महिन्यात कळवला जाईल. शक्यतो स्वत:जवळ एक जादा प्रत ठेवावी. अस्वीकृत लेखन पुरेसे टपालहशील पाठवल्यास परत केले जाईल. अनावश्यक पत्रव्यवहार टाळावा अशी लेखकांना नम्र विनंती आहे.

लेखाची शब्दमर्यादा ५००० शब्दांपर्यंत ठेवावी. जर तेवढ्या मर्यादेत विषयाला न्याय मिळणार नाही, असे वाटले, तरच त्या शब्दमर्यादेत बसतील, असे दोन किंवा तीन लेखांक पाडून लेख पाठवावा. ही पत्रिका केवळ तज्ज्ञांनी तज्ज्ञांसाठी लिहिलेला मजकूर देणारी पत्रिका नाही, हे लक्षात घेऊन लेखाची भाषा शक्यतो सोपी आणि नेमकी ठेवावी, सैद्धांतिक चर्चा असेल, तिथे परिचयातली उदाहरणे द्यावी, पारिभाषिक संज्ञा वापरल्या तर त्याचा अर्थ सोप्या शब्दात उलगडून द्यावा, केवळ कंसांत इंग्रजी प्रतिशब्द देणे पुरेसे मानू नये. (पत्रिकेच्या सर्वच वाचकांना इंग्रजी भाषा येते असे नाही.)

परीक्षणे लिहू इच्छिणाऱ्यांनी संपादकाशी संपर्क साधावा.

पत्रिका ही केवळ भाषिक प्रश्नांचा कणखरपणाने आणि चिकाटीने सामना करण्यासाठी नाही, तर ती शिवाय भाषाव्यवहारातले लावण्य आणि गंमत यांचा आस्वाद घेण्यासाठी किंवा भाषाव्यवस्थेबद्दलचे निखळ कुतूहल शमविण्यासाठी देखील आहे, याचे भान असू दे. अमुक लेखन पत्रिकेच्या विषयप्राप्तीमध्ये बसेल, की नाही याबद्दल शंका असल्यास संपादकांशी संपर्क साधावा. पानपूरकांसाठी मजकूर पाठवला, तर त्याचे स्वागतच आहे.

लेखनाला आधारभूत असा संदर्भ लेखकाचे नाव, शीर्षक, लेखकाच्या जोडीने संपादक किंवा अनुवादक असल्यास त्याचे नाव, उगमस्थळ, प्रकाशनस्थळ, प्रकाशक, प्रकाशनवर्ष असा पुरा द्यावा म्हणजे जिज्ञासू वाचकांची सोय होईल. एकच संदर्भ पुन्हा द्यायचा झाला, तर कित्ता, तत्रैव इत्यादी शब्दांची योजना न करता अत्रे १९५३ किंवा अत्रे १९५३ : पृ. १३ अशी वापरायला अधिक सोपी पद्धत अनुसरावी.





अनुक्रमणिका

## पैसे भरण्याबद्दल सूचना

पैसे रोख दिल्यास आठवणीने पावती घ्यावी. चेक 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. मनीऑर्डर कूपनवर किंवा चेकसोबतच्या चिठ्ठीवर पैसे पाठवणाराचे नाव, पत्ता, रक्कम, आणि ती कशापोटी पाठवली ते अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता मिळाला याचा उल्लेख करावा. चेक बँकेच्या पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत २ रुपये वटणावळ म्हणून भर घालावी. पावती मागाहून पाठविली जाईल.

## पत्रिकेची वर्गणी

पत्रिकेची वार्षिक वर्गणी भरताना पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असेच राहील हे लक्षात घ्यावे. पत्रिकेचे वर्षात चार अंक निघतात. मात्र १९८३ मध्ये केवळ दोनच अंक निघाले आहेत. पत्रिकेचे चालू वर्षाव्यतिरिक्तचे अंक हवे असल्यास मिळू शकतील. सध्यातरी त्यांची आकारणी वर्गणीच्याच दरात करण्यात येते. ती पुढीलप्रमाणे :

चालू वर्गणी परिषदेच्या सामान्य सभासदांसाठी (सभासद वर्गणी धरुन) वर्षाला ३० रु.

चालू वर्गणी संस्था आणि सभासद नसलेल्या व्यक्ती यांसाठी वर्षाला ४० रु.

सुट्या अंकाला (मग तो चालू वर्षाचा असो की मागील वर्षांपैकी असो) १० रु.

मागील अंक मागवताना वर्ष १ (१९८३) मध्ये फक्त दोन अंक निघाले, वर्ष २ (१९८४) पासून मात्र दर वर्षाला चार अंक निघाले हे लक्षात घ्यावे.

## परिषदेची वर्गणी

सामान्य सभासदाची वार्षिक वर्गणी वर दिलीच आहे. एका घरात एकापेक्षा अधिक सामान्य सभासद असले आणि त्यांपैकी एकाच्याच नावावर पत्रिकेचा अंक हवा असला तर इतर सभासदांनी केवळ १५ रु. भरायचे आहेत. उदाहरणार्थ, एका घरात दोन सभासद आणि एक अंक अशी स्थिती असल्यास वर्षाला ३० रु. + १५ रु. भरावे लागतील.

आजीव सभासदत्वासाठी २०० रु. (परदेशी अंक पाठवायचा असल्यास शिवाय १०० रु.); देणगीदारासाठी ५०० रु. किंवा जास्त; आश्रयदात्यासाठी १००० रु. किंवा जास्त. (आजीव, देणगीदार, आश्रयदाता सभासदांना पत्रिकेची वेगळी वर्गणी नाही.)

परिषदेचे सभासदत्व व्यक्तीला मिळेल, संस्थेला नाही.

## जाहिरातीसाठी दर

पूर्ण पान ७५० रु., अर्धे पान ४०० रु., पाव पान २५० रु., शुभेच्छासूचना १०० रु., आवरणपृष्ठ चार १००० रु., आवरणपृष्ठ दोन / तीन ८०० रु. जाहिरात हिंदीत वा इंग्रजीत असल्यास चालेल, मराठीत असल्यास उत्तम.

नोंदणी क्रमांक 040048/83

मराठी अभ्यास परिषदेने प्रकाशित केलेल्या
खुसखुशीत, आकर्षक रंगरूपाच्या चिकटचिठ्ठ्या*
तुमच्या संग्रहात आहेत का ?




नसल्या तर त्वरा करा, थोड्याच शिल्लक आहेत !
असल्या तरी आणखी घेऊन त्या
मित्रमैत्रिणींना भेट द्या.

मराठीचा अभिमान जागवण्याचे श्रेय घ्या !
आणि खसखस पिकवण्याचे पण !

किरकोळ विक्री : प्रत्येकी २ रु. पाच चिठ्ठ्यांचा एक असे
पाच संच घेतल्यास २५ टक्के सूट
गिऱ्हाइकांनी आणि विक्रेत्यांनी संपर्क साधावा.

ग्रंथघर, जीवनदर्शन, २७८–७९ नारायण पेठ
न. चिं. केळकर रस्ता, पुणे ४११ ०३०

ग्रंथाली, ३४/९०२ नेहरू नगर, मुंबई ४०० ०२४
आणि इतर केंद्रे

* चिकटचिठ्ठ्या ? म्हणजे आपली स्टिकर्स हो !